महाराष्ट्राचे माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान
सहाय्यभूत सेवा धोरण २०१५

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.आयटीपी-२०१३/(प्र.क्र.२६५)/उद्योग-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २५ ऑगस्ट, २०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाने सन १९९८ मध्ये पहिले माहिती तंत्रज्ञान धोरण जाहीर केले होते. त्यानंतर रोजगार निर्मिती, कार्यक्षमतेत वाढ व जीवनमान सुधारण्यासाठी माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००३ व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००९ जाहीर करण्यात आले होते. माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००९ चा कालावधी दिनांक २८ ऑगस्ट, २०१४ पर्यंत असल्यामुळे त्यास नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण अस्तित्वात येईपर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. नवीन माहिती तंत्रज्ञान धोरणाचा दस्ताऐवज तयार करण्यासाठी, माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील विविध भागधारकांशी वेळोवेळी केलेल्या चर्चेच्या निष्कर्षाच्या आधारे या क्षेत्रातील विकासक, माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील तज्ञ प्रतिनिधी, कंपन्यांचे संचालक, नॅसकॉम, टेलिकॉम उद्योगाचे प्रतिनिधी, इतर संबंधित संस्था व यासाठी नेमलेला कार्यबल यांच्याशी विस्तृत चर्चा करण्यात आली आणि यापूर्वीची माहिती तंत्रज्ञान धोरणे राबवितांना विभागाला आलेल्या अनुभवाच्या आधारे, प्रस्तुत धोरणाचा मसुदा तयार करण्यात आला होता. सदर धोरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवांच्या सर्वकष व्यापक विस्तारासाठी माहिती तंत्रज्ञान उद्याने विकसित करणे, झपाट्याने वाढणाऱ्या माहिती तंत्रज्ञान उत्पादन व दूरसंचार उद्योगाच्या क्षमतेवर भर देणे आवश्यक आहे. याकरिता, माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणाची विस्तृत अशी फेर-आखणी करण्यात आली असून महाराष्ट्राचे नविन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०१५ या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येत आहे. सदर धोरणाची प्रत **(परिशिष्ट-१)** या शासन निर्णयासोबत संलग्न असून, त्यातील खालील बाबींना विवक्षितपणे या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**२. राज्याच्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणाची उद्दिष्टे व लक्षांक**

२.१ राज्याच्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणाची वैशिष्टे:-

अ) महाराष्ट्राचे माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा क्षेत्रातील अग्रस्थान कायम राखणे.

ब) राज्यातील औद्योगिकदृष्टया कमी विकसित भागात आणखी गुंतवणूकीचा ओघ वाढविण्यासाठी चालना देणे.

क) राज्याच्या सर्व भागातील, समाजाच्या सर्व स्तरातील शिक्षित तरुणांना अधिक रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देणे.

ड) निर्यात उलाढालीतील उच्च पातळी गाठून त्याव्दारे राज्याच्या स्थुल घरगुती उत्पादनात आणि उत्पादकतेत वाढ घडवून आणणे.

इ) राज्याच्या सामाजिक व आर्थिक विकासाकरिता एक साधन म्हणून माहिती तंत्रज्ञान क्षेत्राचा वापर करणे.

फ) मूळ सामुग्री निर्मितीसह नवीन उत्पादन व बिझनेस टु बिझनेस आणि बिझनेस टु कस्टमर यांना पुरविल्या जाणाऱ्या अव्दितीय सेवांकरिता बौध्दीक मत्ता निर्मितीस प्रोत्साहन देणे.

## २.२ राज्याच्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ चे लक्ष्यांक

अ) धोरण कालावधीत माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक तसेच माहिती तंत्रज्ञान उद्यानाच्या स्थापनेसाठी रु ५०,००० कोटी इतकी गुंतवणूक आकर्षित करणे ,

ब) १० दशलक्ष नवीन रोजगार निर्माण करणे

क) महाराष्ट्र राज्यात या क्षेत्रातील वार्षिक निर्यात रु. १,००,००० कोटी पर्यंत वाढविणे.

## ३. माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणातील उद्दीष्टे साध्य करण्याकरिता खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यास शासन मान्यता देत आहे.

३.१ माहिती तंत्रज्ञान उद्यांनाकरिता अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक व जागेचा वापर :-

३.१.१ जागेची वाढती किंमत हा माहिती तंत्रज्ञान उद्योग विस्तारास अडसर ठरत असल्याने उद्योजकांना किफायतशीर दराने बांधीव क्षेत्र उपलब्ध होण्यासाठी मूळ चटईक्षेत्र निर्देशांकावर अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय करण्यात येईल.

३.१.२ उद्योग संचालनालयाने या धोरणान्वये (Present Policy) तसेच या पूर्वी माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्य्भूत सेवा धोरणा अंतर्गत स्थापन करण्यास मान्यता दिलेल्या सर्व नोंदणीकृत सार्वजनिक व खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने, माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रे किंवा विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्याने आणि सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील एकाकी घटक यांना अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता, खालीलप्रमाणे १०० टक्क्यांपर्यंत अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देण्यात येईल.

- पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर या महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद आणि राज्यातील विना उद्योग जिल्हे तसेच नक्षलग्रस्त भाग (सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अन्वये घोषित केलेले) वगळून इतर सर्व ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या १० टक्के अधिमूल्य आकारुन,

- पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद या ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या ३० टक्के अधिमूल्य आकारुन

३.१.३ उद्योग संचालनालयाने या धोरणांतर्गत (Present Policy) तसेच पूर्वीच्या माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणा अंतर्गत स्थापन करण्यास मान्यता दिलेल्या आणि किमान १८ मीटर रुंदीचा जोड रस्ता उपलब्ध असणाऱ्या सर्व नोंदणीकृत सार्वजनिक व खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने, माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रे किंवा विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्याने आणि सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील एकाकी घटक यांना अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता, खालीलप्रमाणे १०० टक्क्यांच्यावर आणि २०० टक्क्यांपर्यंत अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देण्यात येईल.

३.१.४ वरील परिच्छेद ३.१.२ मधील १०० टक्के अतिरिक्त चटईक्षेत्रापेक्षा वाढीव १०० टक्के चटईक्षेत्रासाठी ( १०० टक्के ते २०० टक्के अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक ) खालीलप्रमाणे अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता उपलब्ध करुन देण्यात येईल.

अ) पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर या महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद आणि राज्यातील विना उद्योग जिल्हे तसेच नक्षलग्रस्त भाग (सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अन्वये घोषित केलेले) वगळून इतर सर्व ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या १० टक्के अधिमूल्य आकारण्यात येईल.

ब) पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद या ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या ३० टक्के अधिमूल्य आकारण्यात येईल.

टिप :- मूळ चटई क्षेत्र निर्देशांक १.०० पेक्षा जास्त असला तरी १०० % अथवा २०० % अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक धरुन एकूण चटई क्षेत्र निर्देशांक ३.०० पेक्षा जास्त अनुज्ञेय असणार नाही.

३.१.५ राज्यातील विना उद्योग जिल्हे तसेच नक्षलग्रस्त जिल्हे यामधील (सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अन्वये घोषित केलेले) वरील परिच्छेद ३.१.२ आणि ३.१.४ नुसार खाजगी व सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानासाठी अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशाकांकरिता कोणतेही अतिरिक्त अधिमूल्य आकारले जाणार नाही.

३.१.६ पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद या ठिकाणच्या सार्वजनिक तसेच खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने/ एव्हीजीसी उद्याने यांना एकूण बांधकाम क्षेत्रफळाच्या किमान ८० टक्के क्षेत्र माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवांसाठी व उर्वरित कमाल २० टक्क्यांपर्यंत क्षेत्र (पार्किंग क्षेत्र वगळून) पूरक सेवांसाठी अनुज्ञेय करण्यात येईल.

३.१.७ वरील परिच्छेद ३.१.६ मध्ये नमूद केलेल्या महानगरपालिका व नगरपरिषद वगळता राज्यातील इतर सर्व ठिकाणच्या सार्वजनिक तसेच खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने/ एव्हीजीसी उद्याने यांना एकूण बांधकाम क्षेत्रफळाच्या किमान ६० टक्के क्षेत्र माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवांसाठी व उर्वरित कमाल ४० टक्क्यांपर्यत क्षेत्र (पार्किंग क्षेत्र वगळून) पूरक सेवांसाठी अनुज्ञेय करण्यात येईल.

## ३.२ (अ) माहिती तंत्रज्ञान /माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांसाठी आर्थिक प्रोत्साहने :-

### ३.२ (अ) (१) मुद्रांक शुल्कात सूट

माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, मुद्रांक शुल्कात खालीलप्रमाणे सूट अनुज्ञेय राहील.

अ) राज्यातील सी, डी, डी+, ना-उद्योग जिल्हे आणि नक्षलग्रस्त क्षेत्रातील सर्व माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, तारणगहाण, हडप, तारण, हक्कलेख निक्षेप, अभिहस्तांतरण पत्र, गहाण मालमत्तेवरील प्रभार, भाडेपट्टा, गहाणखत आणि गहाणखतावरील प्रतिभूति-बंधपत्र या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

ब) अ व ब प्रवर्ग क्षेत्रामधील सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील, नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक, किंवा अस्तित्वातील घटकांचे विस्तारीकरण यासाठी - तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र आणि भाडेपट्टा या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

क) अ व ब प्रर्वगामधील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील नविन व विद्यमान घटकांचे विस्तारित माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर व दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह) सेझमधील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान, माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र यांना तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र, भाडेपट्टा आणि सार्वजनिक अभिहस्तांकित भाडेपट्टा या व्यवहारांकरीता, मुद्रांक शुल्कात ७५ टक्के सूट देण्यात येईल.

ड) अ व ब प्रवर्ग क्षेत्रामधील विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्यानातील आणि माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रातील नवीन व विद्यमान घटकांचे विस्तारीत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक ( माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह) आणि अ आणि ब प्रवर्गामधील एसटीपीआयने मान्यता दिलेल्या नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान घटकांना तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र व भाडेपट्टा आणि पब्लिक असाईमेंट लिझ या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

इ) मुंबई मुद्रांक अधिनियम १९५८ च्या कलम ६० अन्वये माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या अभिहस्तांकित भाडेपट्ट्यांना आणि कलम ३६-ए खाली माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या संमती व परवानगी करारनाम्यांना मुद्रांक शुल्कात ७५ टक्के सूट देण्यात येईल. (प्रस्तुत परिच्छेद वरील, अ) ब) व क) च्या सह वाचावे.)

फ) राज्यातील नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांचे विलीनीकरण/ विभक्त आणि फेररचना याकरिता मुद्रांक शुल्कातून ७५ टक्के सूट देण्यात येईल.

या धोरणांतर्गत येणाऱ्या उद्योगांना मुद्रांक शुल्कातून माफी देण्यापूर्वी शासनाच्या इतर कोणत्याही धोरण / योजनांतर्गत संबंधित उद्योग घटकांना मुद्रांक शुल्कातून माफी घेतल्याची पडताळणी करणे गरजेचे असल्याने, उद्योग विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून माफीबाबत ना-हरकत प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य असेल.

### ३.२ (अ) (२) विद्युत शुल्क भरण्यापासून सूट :-

उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत झालेल्या नवीन माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, उत्पादनात गेल्याच्या दिनांकापासून अ व ब क्षेत्रातील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान, सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यान आणि सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील एकाकी घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह), माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रे, विशेष आर्थिक क्षेत्रातील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील घटकांना १० वर्षाच्या कालावधीसाठी आणि नोंदणी देतेवेळी प्रचलित सामुहिक प्रोत्साहन योजनेतील क्षेत्राच्या वर्गीकरणानुसार राज्यातील इतर भागांसाठी १५ वर्षे कालावधीसाठी विद्युत शुल्क भरण्यापासून सूट देण्यात येईल.

माहिती तंत्रज्ञान कंपन्यांनी त्यांच्या स्वत:च्या वापरासाठी उभारलेल्या एकाकी घटक माहिती तंत्रज्ञान उद्यानांना (सिंगल युनिट पार्क्स) पुरक सेवा वगळून, विद्युत शुल्क माफीची सवलत वरील नमूद कालावधीसाठी अनुज्ञेय राहील. माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रामधील नवीन माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक, विशेष आर्थिक क्षेत्रामधील माहिती तंत्रज्ञान उद्यानातील नवीन माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक आणि विशेष आर्थिक क्षेत्रातील एसटीपीआय किंवा अन्य सक्षम प्राधिकरणांना अंतर्गत नोंदणीकृत १०० टक्के निर्यातप्रधान माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना विद्युत शुल्क भरण्यापासून कायमस्वरुपी सूट देण्यात येईल.

### ३.२ (अ) (३) औद्योगिक दराने वीज पुरवठा :-

उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत असलेल्या माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या (MERC) वीज दराच्या आदेशाप्रमाणे औद्योगिक दराने वीज पुरवठा करण्यात येईल.

**३.२ (अ) (४) वीज दर अनुदान :-**

सामूहिक प्रोत्साहन योजनेमध्ये वर्गीकृत असलेल्या "अ" व "ब" व्यतिरिक्त इतर वर्गीकृत क्षेत्रात, स्थापन होणाऱ्या, उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत असलेल्या नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान घटकांना, खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील उद्योग संचालनालयाकडे नोंदणी दिनांक आणि आयटी / आयटीएस ॲक्टिव्हिटी सुरु केल्याच्या दिनांकापासून केलेल्या वीज वापराच्या प्रति युनिट रु.१/- या दराने ३ वर्षापर्यंत होणारी रक्कम अथवा घटकाने नोंदणी घेण्याच्या दिवशी हार्डवेअरमध्ये केलेली गुंतवणूकीची रक्कम यातील जी रक्कम कमी असेल, तेवढे अनुदान मिळण्यास पात्र असेल. या क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र आणि विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्यान यामधील माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक सदर अनुदान मिळण्यास पात्र असतील.

**३.२ (अ) (५) निवासी दराच्या सममूल्य दराने मालमत्ता कर :-**

उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत असलेल्या माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना संबंधित अधिकार क्षेत्रात लागू असलेल्या निवासी दराच्या सममूल्य दराने मालमत्ता कर आकारण्यात येईल. सदरचा लाभ देण्याचा आवश्यक सल्ला शासनाच्या नगर विकास विभागाकडून स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येईल.

**३.२. (अ) (६) जकात /प्रवेश कर / स्थानिक संस्था कर इत्यादी उपकरातून सूट :-**

नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना स्वत:च्या उपभोगासाठी आयात केल्या जाणाऱ्या भांडवली वस्तु आणि कच्चा माल यांच्या जकात/ प्रवेश कर/ लोकल बॉडी टॅक्स (एलबीटी) किंवा त्यांच्याऐवजी लावलेल्या अन्य उपकरातून सूट देण्यात येईल. माहिती तंत्रज्ञान/माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना सदरचा लाभ देण्याचा आवश्यक सल्ला शासनाच्या नगर विकास विभागाकडून स्थानिक स्वराज्य संस्थाना देण्यात येईल.

**३.२ (अ) (७) कार्य संवेदा करात सवलती :-**

अपवादात्मक बाबी वगळता माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या वार्षिक देखभाल कराराकरिता सर्वसाधारणपणे केंद्रिय पातळीवरील संबंधीत शक्ती प्रदान समितीने शिफारस केलेल्या किमान दरानुसार कार्य संवेदा कर (Works Contract Tax) आकारण्यात येईल.

**३.२ (अ) (८) मूल्यवर्धित करामध्ये सवलती :-**

अपवादात्मक बाबी वगळता माहिती तंत्रज्ञान उत्पादनावरील मुल्यवर्धित कर सर्व साधारणपणे केंद्रिय पातळीवरील संबंधीत शक्ती प्रदान समितीने शिफारस केलेल्या किमान दरानुसार आकारण्यात येईल.

## ३.२.(ब) माहिती तंत्रज्ञान उद्योजक / विकासकांकरिता प्रोत्साहने :-

i) उद्योग संचालनालय / विकास आयुक्त (सेझ) यांनी उद्योग संचालनालयाच्या सहमती ने माहिती तंत्रज्ञान उद्यानांना नोंदणी दिल्यानंतर खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील सामायिक सेवा / पूरक सेवा क्षेत्रातील घटकांनी वापरलेल्या सामायिक सेवा वगळून इतर घटकांनी वापरलेल्या सामायिक सेवांच्या संदर्भात (जसे की, लॉबी, मध्यवर्ती वातानुकुलित प्रणाली, उद्वाहके (लिफ्ट्स) / सरकते जिने (एसकेलेटर्स), सामायिक सांडपाणी प्रक्रिया सयंत्र, वॉशरुम्स इत्यादी) वीजेची आकारणी औद्योगिक दराने करण्यास खालील अटींवर शासन याव्दारे मान्यता देत आहे.

विकासकानी प्रत्येक माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना भाडे पट्टयाने अथवा विकत घेतलेल्या जागेसाठी स्वतंत्र विद्युत मीटर पुरविणे आवश्यक राहील.

ii) माहिती तंत्रज्ञान उद्यानामधील एकूण बांधकाम क्षेत्र विचारात घेऊन किमान ६(सहा) वॅट प्रति चौ. फूट याप्रमाणे विकासकाने विद्युत पुरवठा व्यवस्था / विद्युत उपकेंद्र उभारण्याची तरतूद करणे आवश्यक राहील. सदरची तरतूद अस्तित्वातील माहिती तंत्रज्ञान उद्यानांनाही लागू राहील.

iii) राज्य शासन आणि नागरी स्थानिक संस्थांच्या महामार्गांना जोडण्यासाठी उच्च प्रतीचे रस्ते बांधण्याच्या संदर्भातील गुंतवणुकीस पुरक अशी गुंतवणूक करण्यास, खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांच्या विकासकांना परवानगी देण्यात येत आहे. असे रस्ते बांधण्याचे काम पूर्ण झाल्यावर विकासकांकडून नागरी स्थानिक संस्थांना/ राज्य सार्वजनिक बांधकाम विभाग/ जिल्हा परिषद किंवा इतर एजन्सी ज्यांच्या मालकीचा रस्ता आहे त्यांना तो रस्ता हस्तांतरित करण्यात येईल.

नागरी स्थानिक संस्था / राज्य सार्वजनिक बांधकाम विभाग/ जिल्हा परिषद किंवा इतर एजन्सी ज्यांचा मालकीचा तो रस्ता आहे, त्या रस्ता बांधणीच्या खर्चाचे मुल्यांकन / पडताळणी करतील आणि विकासकानी केलेल्या अशा गुंतवणुकीचा परतावा “माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाकरिता पायाभूत सुविधा निधी” या निधीमधून भरपाई करण्यात येईल.

सदर गुंतवणूकीची भरपाई विकासकांनी अतिरिक्त चटईक्षेत्र मिळविण्यासाठी भरलेल्या अधिमुल्याच्या रकमेच्या मर्यादेत राहील.

iv) “माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी निर्माण करणे :-

राज्य शासन व नियोजन प्राधिकाऱ्यांनी माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ च्या अनुषगांने खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांकडून अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकापोटी मिळणाऱ्या अधिमूल्याच्या रकमेचा “ माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगांकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी” म्हणून स्वतंत्र निधी

उभारण्यात येईल व या निधीचा विनियोग केवळ माहिती तंत्रज्ञान उद्योगासाठी आवश्यक असणाऱ्या पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच करण्यात येईल. तसेच या निधीतून माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ मधील परिच्छेद ५ (अ) (v) मध्ये नमूद केल्याप्रमाणे विकासकाने केलेल्या कामाची भरपाई करण्यात येईल.

उपरोक्त “क्रिटीकल” पायाभूत सुविधा निधी” चे संनियंत्रण उद्योग विभगाच्या अधिपत्याखाली ठेवण्यात येऊन, त्यासाठी शक्तीप्रदान समितीच्या अंतर्गत खालीलप्रमाणे एक उपसमिती गठीत करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (उद्योग), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव - ग्राम विकास विभाग | सदस्य |
| ४ | सचिव, नगर विकास विभाग (नवि-२) | सदस्य |
| ५ | सचिव - सार्वजनिक बांधकाम विभाग (रस्ते) | सदस्य |
| ६ | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय | सदस्य |
| ७ | आयुक्त /मुख्याधिकारी - संबंधित नागरी स्थानिक संस्था | सदस्य |
| ८ | उप सचिव (उद्योग), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग | सदस्य सचिव |

v) उपसमितीचे कार्यक्षेत्र

ही समिती रस्त्यांच्या प्रकल्पांसंबंधी जलद गतीने निपटारा करणे, अंमलबजावणी आणि तत्संबंधित इतर बाबींवर निर्णय घेईल आणि निधीचे व्यवस्थापन करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

vi) अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण

उपरोक्त उपसमितीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण उद्योग विभागांतर्गत गठीत सामूहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत राज्य पातळीवरील समिती करेल व याबाबतचा अहवाल वेळोवेळी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदान समितीला सादर करेल.

### ३.३. ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स (ए. व्ही. जी. सी.) या क्षेत्राचे प्रवर्तनासाठी प्रोत्साहने

३.३.१. ए. व्ही. जी. सी. ही मूलत: माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवेची संलग्न बाब असल्याने, माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवेसाठी अनुज्ञेय असलेले फायदे मिळण्यास पात्र ठरविण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

३.३.२ राज्यात ए. व्ही. जी. सी. केंद्राच्या स्थापनेव्दारे सामायिक सोयी /सुविधा पूरवल्यास, शासन पाठिंबा देईल. ए. व्ही. जी. सी. केंद्रामध्ये निर्मिती सुविधा, ए. व्ही. जी. सी. स्टुडिओ, कला सादर करण्यासाठी सभागृह, प्रदर्शन गॅलरी आणि कलाकारास काम करण्यासाठीचे ठिकाण या सारख्या एकात्मिक सुविधांचा आणि एका समितीने, ए. व्ही. जी. सी. केंद्राकरिता पायाभूत सोयी-सुविधांच्या

गरजा, व त्यासाठी आवश्यक निधी कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक (ऑपरेटिंग मॉडेल) जसे पीपीपी , स्थान, सुविधा इत्यादी बाबी उद्योगाशी विचार विनिमय करुन सुनिश्चित करण्यासाठी विकास आयुक्त (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील एक समिती गठीत करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. सदर समितीची संरचना व कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ३ | व्यवस्थापकीय संचालक, शहर औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ४ | उप सचिव(उद्योग), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग | सदस्य सचिव |

**अंमलबजावणी :-**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (एमआयडीसी) / शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (सिडको) यासाठी पुढाकार घेतील.

**३.३.३ (अ) आर्थिक सवलती :-**

i) राज्यभरातील विविध ललित कला विद्यालये ही डिजिटल आर्ट सेंटर (डीएसी) म्हणून ओळखली जातील. डिजिटल आर्ट व ॲनिमेशन यासाठीचा अभ्यासक्रम विद्यापीठांच्या सहकार्याने राबविणे, आणि डिजिटल आर्ट सेंटर सार्वजनिक-खाजगी-भागीदारी (पीपीपी) मॉडेलवर चालविणे यासाठी येणाऱ्या एकूण खर्चाच्या २५% निधी शासन आणि उरलेला ७५% निधी खाजगी प्रवर्तकाने उभारावयाचा असून यासाठी राज्य शासनाचे योगदान हे रुपये १० कोटी मर्यादेपर्यंत ठेवण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

ii) मुंबई/ पुणे येथे सार्वजनिक-खाजगी-भागीदारी (पीपीपी) मॉडेलवर आधारीत ए. व्ही जी. सी सेंटर ऑफ एक्सलेंन्स ची स्थापना करण्यास आणि त्यासाठी वित्तिय सहाय्य म्हणून येणारा भांडवली खर्च व उपकरणे खरेदी वरील खर्च शासनाकडून पुरविण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

**३.३.३ (ब) व्हेंचर कॅपिटल फंड निर्माण करणे :-**

आंतरराष्ट्रीय तसेच देशांतर्गत बाजारातील वाढती मागणी पूर्ण करण्यासाठी व्हेंचर कॅपिटल फंडची गरज आहे. ए. व्ही. जी. सी. क्षेत्रासाठी सुरुवातीला रु. ५० कोटी इतका व्हेंचर कॅपिटल फंड उभारण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे. या फंडातून वित्तीय सहाय्यतेच्या संदर्भात मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील शक्तीप्रदान समिती, प्रकरणपरत्वे गुणवत्तेच्या आधारावर निर्णय घेईल.

**ए. व्ही. जी. सी. घटकांना वरील परिच्छेद ३.२ (अ) मध्ये असलेल्या सवलतीं व्यतिरिक्त खालील सवलती मिळतील.**

**३.३.३. (क) प्रमाणपत्र शुल्क परतावा:-**

सर्व ए. व्ही. जी. सी. निर्यातप्रवण घटकांना अनिवार्य मार्कींगसाठी, -जसे Conformity European (CE), China Compulsory Certificate (CCC)॰ इत्यादी येणाऱ्या खर्चाचा ५०% मर्यादेपर्यंत व प्रत्येक घटकास जास्तीत जास्त रुपये २ लक्ष इतक्या मर्यादेच्या अधीन राहून परतावा करण्यात येईल.

**३.३.३ (ख) भांडवली अनुदान :-**

राज्याच्या औद्योगिक धोरणानुसार औद्योगिक प्रोत्साहन अनुदान देण्यात येईल तसेच जे. ए. व्ही. जी. सी. घटक किमान रुपये ५० कोटीची गुंतवणूक करतील आणि किमान १०० लोकांसाठी रोजगार निर्माण करतील त्या घटकांना स्थिरभांडवलाच्या २५% इतके अँकर युनिट अनुदान म्हणून देण्यात येईल. स्थिर भांडवलामध्ये जमीन, इमारत, यंत्रसामग्री, उपकरणे, विद्युतीकरण, भांडवलीकृत उत्पादन पूर्व खर्च मधील गुंतवणुकीचा समावेश असून प्रत्येक जिल्ह्यातील एका अँकर युनिटला सहाय्य करण्यात येतील.

**३.३.३ (ग) करमणूक कर भरण्यापासून सूट:-**

i) राज्यात निर्मित झालेल्या आणि राज्यातील सिनेमा हॉल/ मल्टिप्लेक्समध्ये प्रदर्शित झालेल्या, ॲनिमेशन चित्रपटांना करमणूक कर भरण्यापासून सूट देण्यात येईल.

ii) महाराष्ट्रात स्टीरीओस्कोपीव्दारे २डी तून ३डी मध्ये पूर्णपणे रुपांतरीत करण्यात आलेला आणि राज्यातील सिनेमा हॉल/ मल्टिप्लेक्समध्ये प्रदर्शित झालेल्या चित्रपटांना अदा केलेल्या करमणूक कराच्या ५० टक्के इतका परतावा अथवा रु २.५ कोटी यापैकी जे कमी असेल इतक्या रक्कमेचा परतावा देण्यात येईल.

iii) महाराष्ट्रात तयार करण्यात आलेल्या एखादया लाईव्ह ॲक्शन चित्रपटामध्ये एकूण लांबीच्या किमान ५०% हून अधिक भाग ॲनिमेशन व व्हीज्युअल इफेक्ट याव्दारे बनविण्यात आला असेल आणि राज्यातील सिनेमा हॉल/ मल्टिप्लेक्समध्ये प्रदर्शित झालेल्या चित्रपटांना अदा केलेल्या करमणूक कराच्या ५० टक्के इतका परतावा अथवा रु २.५ कोटी यापैकी जे कमी असेल इतक्या रक्कमेचा परतावा देण्यात येईल. डीआय व कलर करेक्शन हा ॲनिमेशन/ व्हीज्युअल इफेक्टसचा भाग मानला जाणार नाही. चित्रपटाच्या एकूण लांबीच्या किमान ५०% पेक्षा अधिक हा पात्रतेचा निकष राहील.

iv) खालील वार्षिक कार्यक्रमांसाठी महाराष्ट्र हे यजमान राज्य असेल व प्रत्येक वार्षिक कार्यक्रमांना प्रायोजक म्हणून पुढील ५ वर्षापर्यंत रुपये १० लाख पर्यंतचा खर्च स्विकारेल आणि अशा कार्यक्रमांना करमणूक कर भरण्यापासून सूट देण्यात येईल.

१) फिक्की फ्रेम (FICCI FRAME) - बेस्ट ॲनिमेटेड फ्रेम्स अॅवॉर्ड, मुंबई.
२) नॅसकॉम (NASSCOM) - गेम डेव्हलपर्स कॉन्फरन्स, पुणे.
३) द ॲनिमेशन सोसायटी ऑफ इंडिया - ॲनिफेस्ट, मुंबई.
४) ASIFA - जागतिक ॲनिमेशन दिन- प्रत्येक वर्षी २८ ऑक्टोबर.
५) एमसीसीआयए- डिजिटल कन्टेंट इव्हेंट, पुणे.
६) एनआयएलएफ- नॅसकॉम इंडियाज लिडरशीप फोरम.

घ) राज्यात निर्मित करण्यात आलेल्या सर्जनशील कला चित्रपट, शैक्षणिक, वैज्ञानिक, पौराणिक आणि बाल चित्रपट या ॲनिमेशन चित्रपटांना, उत्पादन खर्चाच्या ५०% इतके भांडवली अनुदान रु. ३० लक्ष कमाल मर्यादेच्या अधीन राहून दिले जाईल.

**३.३.(४) ए.व्ही. जी. सी. घटकांना खालील बिगर वित्तिय सहाय्य देण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे :-**

१) देशी व विदेशी संस्थांच्या संयुक्त उपक्रमांना (Joint Ventures) राज्य शासन प्रोत्साहित करेल.

२) महाराष्ट्रातील ए. व्ही. जी. सी. संदर्भातील आंतरराष्ट्रीय मेळावा (इव्हेंट्स) समर्थन (Support) देण्यात येईल.

३) कायदेशीर चौकटीच्या माध्यमातून बौद्धिक मालमत्ता (आयपी) संरक्षित केली जाईल.

**३.४(अ) ग्रामिण आणि निमशहरी भागात बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंगचे (बीपीओज) या उपक्रमांचे वाढीस उद्युक्त करण्यासाठी खालील अटींवर प्रोत्साहने देण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे :-**

i) अस्तित्वात असलेल्या बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंग घटकांना/ उद्योजकांना ग्रामीण व निमशहरी क्षेत्रात त्यांच्या शाखा उभारण्यासाठी प्रोत्साहित करण्यात येईल.

ii) ग्रामीण व निमशहरी (ग्रामपंचायत, अ, ब व क वर्ग नगरपरिषद) भागात स्थित असलेल्या बी. पी. ओ. घटकांनाच अनुदान देण्यात येईल.

iii) कोणत्याही ग्रामीण बी. पी. ओ. घटकास त्यांनी केलेली भांडवली गुंतवणूक जसे हार्डवेअर, उपकरणे इत्यादीवर २० % भांडवली अनुदान रू. २५ लक्ष मर्यादेच्या अधीन राहून देण्यात येईल.

तथापि

- सदर घटकाने किमान ५० (पन्नास) लोकांना प्रशिक्षण देऊन प्रत्यक्ष रोजगार दिला असावा हे भांडवली अनुदान बॅक ऐंडेड राहील.
- ते तीन समान हप्त्यांमध्ये प्रत्येक वर्षाच्या शेवटी देण्यात येईल.
- भांडवली अनुदान देताना घटकाने नवीन हार्डवेअर आणि उपकरणे यामध्ये केलेली भांडवली गुंतवणूक ज्याप्रमाणे सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम (MSME) Plant & Machinary वर केलेल्या गुंतवणूकीप्रमाणे विचारात घेतली जाईल.

**iv) प्रशिक्षण अनुदान:-**

ग्रामीण बी. पी. ओ. यांना कर्मचाऱ्यांच्या कामाच्या गुणवत्तेमध्ये उणीवा राहू नयेत, तसेच वेळेवर अंमलबजावणी व्हावी, इत्यादीसाठी प्रशिक्षणामध्ये गुंतवणूक करावी लागते, म्हणून याठिकाणी स्थापित होणाऱ्या नवीन बी. पी. ओ. ना कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षणाकरिता पुढील " प्रशिक्षण अनुदान" देण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

- प्रशिक्षण अनुदानाची रक्क्म कंपनी आणि शासन यामध्ये विभागण्यात येईल शासनामार्फत प्रति व्यक्ती प्रतिमहा रु. १५०० / - याप्रमाणे तीन महिन्याच्या कालावधीसाठी, प्रशिक्षण अनुदान म्हणून देण्यात येईल (बी.पी.ओ. उद्योगामध्ये कौशल्य विकसित होण्यासाठी सामान्यपणे तीन महिने प्रशिक्षण कालावधी लागतो). त्यामुळे ५० व्यक्तींना रोजगार देणाऱ्या घटकाला तीन महिन्यांच्या कालावधीसाठी रुपये २.२५ लक्ष (रुपये दोन लक्ष पंचवीस हजार फक्त) प्रशिक्षण अनुदान मिळेल. हे अनुदान बॅक एन्डेड असून, बी. पी. ओ. घटकांना त्यांनी व्यक्तीला तीन महिने प्रशिक्षण आणि सतत नऊ महिने रोजगार पुरविल्यानंतर म्हणजेच एक वर्षा नंतर देण्यात येईल.

- याकरिता यशदा, MCED , MITCON व MESC यासारख्या मान्यताप्राप्त संस्थांकडून प्रशिक्षण सामुग्री अभ्यासक्रम वितरीत करण्यात येईल. या संदर्भातील कार्यवाही व मार्गदर्शक तत्वे स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील

**३.४ (ब)** मुंबईवर विशेष भर देऊन डेटा सेंटर्सचे प्रवर्तन करण्यासाठी , तसेच केवळ भारतातच नव्हे तर आशिया पॅसेफिक विभागात डेटा सेंटर हब म्हणून प्रवर्तन करण्यासाठी राज्यात कोठेही स्थापित होणारे व खालील अटी व शर्तीची पूर्तता करणारे डेटा सेंटर्स यांना सोबतच्या धोरणातील परि. ५ ब मध्ये नमूद केलेल्या १) मुद्रांक शुल्क सूट २) विद्युत शुल्क ३) विद्युत दर ४) मालमत्ता कर ५) प्रवेश कर आणि कोणत्याही क्षेत्रात घटकांची उभारणी करण्यासाठी सवलत (फक्त विशेष वस्तूंच्या आयातीसाठी) आणि उर्वरित घटकांना उद्योगाचा दर्जा मिळण्याबाबतच्या सवलती मिळण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**४. अन्य प्रोत्साहने :-**

**४.१ उद्योजकता, नाविन्यास आणि इनक्युबेशन सुविधांकरिता प्रोत्साहन**

i) विविध शैक्षणिक संस्था व संशोधन संस्था आणि माहिती तंत्रज्ञान उद्योग, यांच्यात ज्ञान स्रोतांची देवाण-घेवाण व प्रसार होण्यासाठी एक सामाईक व्यासपीठ उभारुन लहान उद्योगांकरीता -इनक्युबेशन सेंटर"ची स्थापना करण्यास शासन मदत करेल. माहिती व दूरसंचार, तंत्रज्ञान क्षेत्रासाठी , एम्बेडेड सॉफ्टवेअर, चिप तंत्रज्ञान, दूरसंचार तंत्रज्ञान, आधार कार्डशी संलग्न सुविधांचा वापर याकरीता सबंध राज्यात इन्क्युबेशन सेंटर्सची स्थापना करण्याकरिता आणि एक मॉडेल व चौकट निश्चित करण्यासाठी विकास आयुक्त (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली, पुढे नमूद केल्याप्रमाणे एक समिती स्थापन करण्यास शासन या व्दारे मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | विकास आयुक्त (उद्योग) | अध्यक्ष |
| २ | सह मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ३ | व्यवस्थापक, कौशल्य विकास | सदस्य |
| ४ | संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्रराज्य, पुणे | सदस्य |
| ५ | माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवेतील उद्योगाचे प्रतिनिधी (दोन सदस्य) | सदस्य |
| **६** | उप सचिव (उद्योग) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीने आपला अहवाल शासनास ३ महिन्यात सादर करावा.

ii) नवीन घटकांना सक्षम करण्यासाठी इनक्युबेशनच्या सुविधा देण्याकरिता नवीन माहिती तंत्रज्ञान उद्यानांना त्यांच्या बांधीव क्षेत्राच्या कमीत कमी २ टक्के क्षेत्र वाटप करावे लागेल. उद्यानाचे हे क्षेत्र माहिती तंत्रज्ञानाच्या कार्याकरिता वापरावयाच्या क्षेत्राचा एक भाग म्हणून गणन्यात येईल व सदर अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांकाचा लाभ मिळण्यास पात्र ठरेल.

iii) माहिती तंत्रज्ञान /माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा क्षेत्रात २ वर्षात किमान ५० स्थानिक विद्यार्थ्यांना भरती करणाऱ्या इन्क्युबेशन लॅबोरेटरी/ संशोधन व विकास केंद्रांना रुपये २.५ लक्ष पर्यंत भरती अनुदान देण्यात येईल.

iv) नॅसकॉम आणि आयटीपीओ यांनी आयोजित केलेल्या अथवा मान्यता दिलेल्या प्रदर्शनात भाग घेणाऱ्या नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा सुक्ष्म, लघु व मध्यम घटकांना प्रदर्शनात भाग घेण्यासाठीच्या शुल्काच्या ५० % (जागेची किंमत / भाडे) रक्कम परतावा देण्यात येईल. प्रत्येक युनिटसाठी रु. ३ लक्ष रक्कमेच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून घटक अथवा कंपनी यांना त्यांचे हयातीत जास्तीत जास्त २ कार्यक्रमांसाठी सदरचा लाभ घेता येईल.

v) सुक्ष्म, लघु व मध्यम माहिती तंत्रज्ञान घटकांना /कंपन्याना त्यांचे हयातीत पेटेंट घेण्यासाठी येणाऱ्या खर्चाच्या ५०% रक्कम रुपये ५ लक्ष रक्कमेच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून परतावा करेल.

४.२ (१) माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादक घटक वगळून) कोणत्याही क्षेत्रात (रहिवासी, ना विकास क्षेत्रासह) उभारणी करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

४.२ (२) माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सेवा घटकांचे ग्राहक जगभर विखुरलेले असून ते भिन्न टाइम झोनमध्ये काम करतात. त्यामुळे ग्राहकांसाठी त्यांना २४X७X३६५ तत्वावर काम करणे आवश्यक आहे. माहिती तंत्रज्ञान घटकांना कामाचा व्याप वाढविण्यासाठी जागतिक ग्राहकांनी दिलेल्या कालमर्यादेचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे. यासाठी नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगांना अविरत उद्योग घटकाचा दर्जा देऊन कोणत्याही दिवशी काम बंद न ठेवता म्हणजेच २४X७X३६५ दिवस काम करण्याची परवानगी दिली

जाईल. (राज्यात काही अपवादात्मक परिस्थिती उद्भवल्यास राज्य/ केंद्र सरकारला माहिती तंत्रज्ञान उद्योगांचे काम निलंबित ठेवणे योग्य वाटत असेल तर अशी परिस्थिती वगळता).

४.२ (३) ग्रामीण व निमशहरी भागातील बी. पी. ओ. ना आवश्यक ती सार्वजनिक वाहतूक व्यवस्था उपलब्ध करुन देण्यासाठी शासन खात्री करेल.

४.२(४) ज्याप्रमाणे सुक्ष्म व लघु घटकांना शासनाने सुरक्षा ठेव / बयाणा रक्कम भरण्यापासून सूट दिली आहे त्याच धर्तीवर ग्रामीण व निमशहरी भागातील बी. पी. ओ. ना सुरक्षा ठेव / बयाणा रक्कम भरण्यापासून सूट देण्यात येईल.

४.२(५) माहिती तंत्रज्ञान क्षेत्राच्या वाढीमुळे माहिती सुरक्षितपणे साठविण्यासाठी डाटा सेंटर्सची मागणी वाढली आहे. राज्यातील सोई सुविधा विचारात घेता, या उपक्रमासाठी प्रोत्साहन दिल्यास गुंतवणूक व रोजगार निर्माण होणार आहे. ही बाब विचारात घेता या उपक्रमास इतर माहिती तंत्रज्ञान घटकाप्रमाणेच प्रोत्साहने देण्यात येतील.

**४.३ महाराष्ट्र ब्रँन्ड विकसित करणे :-**

४.३(१) सर्वसाधारणपणे माहिती तंत्रज्ञान क्षेत्राशी आणि विशेषतः ए.व्ही.जी.सी. शी संबंधित असणा-या आंतर-राष्ट्रीय व देश-पातळीवरील व्यावसायिक परिसंवाद, प्रदर्शन इत्यादी कार्यक्रमांच्या महाराष्ट्रातील आयोजनास शासन पाठिंबा देईल.

४.३(२) दोनपेक्षा अधिक लेव्हलवरील, सीएमएम सुरक्षेसाठी आयएसओ २७००१ आणि सीओपीसी व ईएससीएम प्रमाणपत्र प्राप्तीसाठी झालेल्या खर्चापैकी ५० टक्के खर्चाची प्रतिपूर्ती, जास्तीत जास्त रुपये ५ लक्ष, सामुहिक प्रोत्साहन योजनेतील सुक्ष्म व लघु-स्तरावरील माहिती तंत्रज्ञान घटकांना करण्यात येईल.

४.३(३) राज्यातील नोंदणीकृत ए.व्ही.जी.सी. कंपन्यांना त्यांनी वित्तीय वर्षात ए.व्ही.जी.सी. च्या प्रवर्तनासाठी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय बाजार, परिषद, कार्यक्रम याकरिता केलेल्या खर्चाच्या ५० टक्के रकमेइतकी (नोंदणी शुल्क व प्रवास खर्चासाठी प्रतिवर्ष रुपये ३ लक्ष व कमाल रुपये १० लक्ष मर्यादेच्या अधीन राहून रक्कमेचा) परतावा करण्यात येईल.

४.३(४) दर वर्षी २० ऑगस्ट हा दिवस राज्याचा माहिती तंत्रज्ञान दिन म्हणून यापुढेही साजरा करण्यात येईल. जेव्हा अत्युत्कृष्ट योगदान देणा-या व कामगिरी करणा-या माहिती तंत्रज्ञान/मा. तं. सहाय्यभूत सेवा घटकांना पुरस्कार प्रदान करण्यात येतील.

**५.** एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरी (IITT) उभारणी संकल्पना ही एकात्मिक औद्योगिक क्षेत्राच्या संकल्पनेतून पुढे आली असल्याने एकात्मिक औद्योगिक क्षेत्राचा भाग म्हणून समजण्यात यावा. धोरणासोबतच्या अनुसूची -ब मधील सविस्तर अटी व शर्तीच्या अनुसरुन आवश्यक त्या बदलासह एकात्मिक औद्योगिक क्षेत्राच्या संदर्भातील तरतुदी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून, लागू करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

**एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरांची (आयआयटीटी) उभारणी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील.**

१) माहिती तंत्रज्ञान उद्योग आणि त्यातील कामगार यांना त्यांची गरज विचारात घेवून, त्यांना आवश्यक त्या सुखसोयी व निवासाची व्यवस्था उपलब्ध करुन देण्यासाठी सदर धोरणा अंतर्गत एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरांची उभारणी करणेबाबतची योजना संकल्पित आहे. एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरांची उभारणी संदर्भातील निकष या शासन निर्णया सोबत जोडलेल्या (परिशिष्ट-१) मधील धोरणा सोबतच्या अनुसूची -ब॰ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहतील.

२) एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरातील माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना लाभ/ प्रोत्साहने, सोबत जोडलेल्या परिशिष्ट - १ मधील धोरणातील परिच्छेद ५ (ब) मध्ये नमूद केलेल्या लाभ/ प्रोत्साहने प्रमाणे असतील.

३) राज्याच्या कोणत्याही भागात एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरे उभारता येऊ शकतील.

४) ही एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरे -स्मार्ट टाऊशिप॰ म्हणून विकसित करण्यात येतील.

**६. माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या विकासाला चालना देण्यासाठी पायाभूत सुविधा निर्माण करणे :-**

माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या विकासाला चालना देण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून राज्य शासन व नियोजन प्राधिकाऱ्यांनी माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ च्या अनुषगांने खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांकडून अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकापोटी मिळणाऱ्या अधिमूल्याच्या रकमेचा “ माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगांकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी” म्हणून स्वतंत्र निधीची उभारणी करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

१) या निधीचा विनियोग माहिती तंत्रज्ञान उद्योगासाठी आवश्यक असणाऱ्या पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच करण्यात येईल.
२) या निधीतून माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ मधील परिच्छेद ५ (अ) (v) मध्ये नमूद केल्याप्रमाणे विकासकाने केलेल्या कामाची भरपाई करण्यात येईल.

**७. माहिती तंत्रज्ञान उद्यानातील बांधीव जागेचा वापर बिगर माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवांकरिता करीत असल्यामुळे करावयाची दंडात्मक कार्यवाही :-**

ज्या खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाने माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणातील तरतूदीनुसार अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांकाचा लाभ घेतला आहे आणि कालांतराने माहिती तंत्रज्ञान उद्यानातील बांधीव जागेचा वापर, माहिती तंत्रज्ञान / बिगर माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा अथवा वाणिज्यिक कार्यासाठी किंवा माहिती तंत्रज्ञान धोरणांतर्गत अनुज्ञेय

असलेल्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर प्रयोजनासाठी वापर करीत असल्याचे निदर्शनास आल्यास, खालील प्रमाणे दंडात्मक कारवाई करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

१) दंडाची रक्कम संबंधित नियोजन प्राधिकरण आणि शासन यांचेकडे ३:१ या प्रमाणात भरण्यात येईल.

२) अशा प्रकरणामध्ये संबंधित खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाला उद्योग संचालनालय व ज्यांनी इमारत आराखडा मंजूर केला आहे असे नियोजन प्राधिकरण यांच्या अधिकारी वर्गाचा गट प्रत्यक्ष जागेला भेट देऊन, खात्री करेल.

३) जे बांधीव क्षेत्र माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा व्यतिरिक्त इतर प्रयोजनासाठी ( Non IT/ITES Activities ) वापरले जात असेल, त्या बांधीव क्षेत्रासाठी रेडीरेकनर दराच्या ०.३ टक्का (तीन दशांश टक्का) प्रति दिवस इतकी रक्कम दंड म्हणून आकारली जाईल.

४) सदरचा दंड हा भोगवटा प्रमाणपत्र (ऑक्युपन्सी सर्टीफीकेट) निर्गमित झाल्याच्या तारखेपासून बिगर माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा यासाठी वापर सुरु असल्याचे तारखेपर्यंतच्या कालावधीसाठी वसूल केला जाईल.

५) ज्यांनी खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाच्या इमारती आराखडयास मंजूरी दिली आहे अशा संबंधित नियोजन प्राधिकाऱ्याकडे दंडांच्या रकमेचा भरणा केल्यावर संबंधित खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाने ज्या मूळ प्रयोजनासाठी इरादापत्र अथवा नोंदणीपत्र घेतले होते त्याच प्रयोजनासाठीच जागेचा वापर पुर्न:स्थापित करेल. जर संबंधित खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान यांनी दंडाची रक्कम भरण्यास आणि/ अथवा जागेचा वापर मूळ प्रयोजनासाठी पुर्न:स्थापित करण्यास अपयशी ठरल्यास, संबंधित नियोजन प्राधिकरण, उद्योग संचालनालयास कळवून खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याना विरुध्द महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ (MR&TP ACT) मधील तरतुदीनुसार उचित कार्यवाही करेल.

## ८. हरित माहिती तंत्रज्ञानाचा विकास

८.१ नैसर्गिक स्त्रोताचे व्यवस्थापन कार्यक्षमरित्या प्रदर्शित करणाऱ्या माहिती तंत्रज्ञान घटकांकरिता पुरस्कार देण्यात येतील.

८.२ ई-कचरा गोळा करण्याच्या पध्दतीचा तसेच पुनरुत्पादन संयंत्रांचा परिपूर्ण विकास करुन त्याचा शासकीय आणि खाजगी संस्थांनी त्यांच्या माहिती तंत्रज्ञान उत्पादनांची विल्हेवाट लावण्यासाठी वापर करण्यास चालना देण्यात येईल.

## ९. कायद्यांच्या संबंधात पुढाकार :

९.१ माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना खालील बाबींसंदर्भात फायदे मिळत राहतील :-

अ) कामाचे तास, कामाच्या पाळया आणि महिला कर्मचा-यांच्या नेमणुकांच्या संदर्भातील दुकाने व आस्थापना अधिनियमातील तरतूदीत शिथिलता.

ब) भौतिक स्वरुपात (Physical Records) हजेरी आणि वेतनविषयक नोंद-वह्या ठेवण्यातून सूट.

क) कामगार विभागातर्फे अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १३ अधिनियमांखालील वार्षिक विवरणपत्रे स्व-प्रमाणित करण्याचा आणि एकत्रित दाखल करण्याचा पर्याय.

९.१.१ माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांनी विविध कामगार कायद्यांखाली ठेवावयाचे कर्मचारी-संबंधातील अभिलेखे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात ठेवण्याची आणि कामगार विभागाच्या संगणकीकरणाच्या प्रगतीला अनुसरुन विवरणपत्रे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात स्वीकारण्याची तरतूद करण्यात येईल.

९.३. जे माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक त्यांच्या उत्पादन प्रक्रियेतून सांडपाणी निर्माण करीत नाहीत आणि अशा घटकांमध्ये १०० पेक्षा कमी कर्मचारी आहेत त्यांना महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडून संमतीपत्र(consents) घेण्यापासून सूट असेल. अशा उद्योग घटकाने इलेक्ट्रॉनिक टाकाऊ वस्तू, वापरलेल्या बॅटरी, वापरलेले तेल यासह विविध टाकाऊ पदार्थांचे वार्षिक विवरणपत्र तयार करुन महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळास सादर करावयाचे आहे. उद्योग संचालनालयामार्फत अशा घटकांची नोंदणी या विशिष्ट अटी घालून करण्यात येईल. अशा एकाकी उद्योग घटकांनी स्थानिक सांडपाणी प्रक्रिया यंत्रणेसोबत जोडणी घेणे आवश्यक राहील.

९.४ विशेष आर्थिक क्षेत्रातील घटकांकरीता कंत्राटी कामगार अधिनियमात मंजूर केलेल्या शिथीलता, विधी मंडळाच्या संमतीस अधीन राहून, माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या बाबतीत देखील विचारात घेण्यात येतील.

९.५ माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर व दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटक वगळून) घटकांना, वीज पुरवठ्याच्या प्रयोजनाकरिता, अखंडित प्रक्रिया घटक म्हणून मानण्यात येईल.

९.६ एमआयडीसी क्षेत्रासहीत इतर ठिकाणच्या माहिती तंत्रज्ञान उद्यानांची उभारणी करण्यासाठीच्या विकास नियंत्रण नियमावली (DCR) व इतर मार्गदर्शक तत्वे एमआयडीसी क्षेत्रासहीत इतर क्षेत्रांसाठी माहिती तंत्रज्ञान धोरणाशी सुसंगत (कनसोनन्स) करण्यात येतील.

## १०. मनुष्यबळ विकास

१०.१ माहिती तंत्रज्ञान उद्योगाकरिता, विशेषतः उच्च क्षमता असणा-या नवीन क्षेत्रांत मनुष्य बळाचा विकास करण्यावर विशेष भर देण्यात येईल.

१०.२ महाराष्ट्र राज्य तांत्रिक शिक्षण मंडळ आणि अन्य संस्था रोजगार मिळवून देणारे कार्यक्रम सुरु करतील आणि अशा कार्यक्रमाचे प्रमाणीकरण करतील. या संस्था नॅसकॉम व अन्य संबंधित संघटनांसोबत तसेच स्थानिक उद्योगाबरोबर चर्चा करतील आणि या क्षेत्रातील गरजा समजून घेतील. या गरजांवर आधारित, प्रमाणिकरणाकरिता आणि याद्वारे रोजगार उपलब्ध करुन देण्याकरिता सुनियोजित कार्यपध्दती ठरविण्यात येईल, ज्यामुळे उद्योगाकरिता योग्य असे मनुष्यबळ तयार होईल. जे लहान माहिती तंत्रज्ञान घटक आवश्यक असलेले प्रशिक्षण देण्यास स्वत: सक्षम नाहीत, त्यांच्या दृष्टीने हे खास करुन महत्त्वाचे आहे.

१०.३ संशोधन व विकास केंद्र, फिनिशिंग स्कूल यासारख्या रोजगाराभिमूख प्रशिक्षण केंद्र, सेंटर ऑफ एक्सलन्स (माहिती तंत्रज्ञान) स्थापन करण्यासाठी सुसाध्यता व तपशीलावर अभ्यास होणे असून सदर कार्यवाही शक्ति प्रदान समिती अंतर्गत कार्यबळ समिती गठीत कार्यबल समितीमार्फत प्रस्ताव तयार करण्यात येईल.

१०.४ माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणाच्या राज्य स्तरावरील अंमलबजावणीचे संनियंत्रण करणे आणि आवश्यक तेथे कार्यपध्दती व नियमावली तयार करणे यासाठी खाली नमूद केल्याप्रमाणे शक्ती प्रदान समितीचे गठन करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

१०.४.१ **सदर समितीची संरचना व कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणे राहील.**

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य / प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य / प्रधान सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य / प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (उद्योग) | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव (नगर विकास-१) | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव / सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव (कौशल्य विकास) | सदस्य |
| ९ | प्रधान सचिव / सचिव (नगर विकास-२) | सदस्य |
| १० | एसटीपीआय संचालक- सदस्य | सदस्य |
| ११ | नॅसकॉमची नामनिर्देशीत व्यक्ति | सदस्य |
| १२ | एमसीएचआय - क्रेडाई ची नामनिर्देशित व्यक्ती | सदस्य |
| १३ | विकास आयुक्त (उद्योग) | सदस्य सचिव |

**१०.४.२ शक्ती प्रदान समितीचे कार्यक्षेत्र:-**

सदर समितीकडून राज्य स्तरावरील धोरणाची अंमलबजावणी व संनियंत्रण आणि आवश्यक ती कार्यपध्दती व निकष तयार करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

i) धोरणातील खालील बाबींची अंमलबजावणी करण्याकरिता व समन्वय ठेवण्याकरिता शक्ति प्रदान समिती एक कार्यबळ समिती स्थापन करेल :-

अ) माहिती तंत्रज्ञान उद्याने/ माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र (सेझ) / ए.व्ही.जी.सी पार्क साठी तरतूदी आणि प्रोत्साहने

ब) माहिती तंत्रज्ञान घटकांसाठी तरतूदी आणि प्रोत्साहने

क) ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स (ए.व्ही.जी.सी.) या क्षेत्रास उद्युक्त (Promote) करणे

ड) ग्रामिण व निमशहरी भागात बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंग (बी.पी.ओ.) या उपक्रमांच्या वाढीस उद्युक्त करणे

इ) डेटा सेंटर्सचे प्रवर्तन

फ) माहिती तंत्रज्ञान संबंधित इनक्युबेशन सुविधा

ग) हरित माहिती तंत्रज्ञानाला प्रोत्साहीत करणे

ह) व्यवसाय सुलभीकरणाच्या संदर्भात कायद्यात बदल करण्यास पुढाकार

ई) मनुष्यबळ विकास

ज) प्रशासकीय उपाययोजना

ii) शासन निर्णय/ अधिसूचना या संबंधित सर्व आदेश/ सुधारणा वेळेवर निर्गमित होतील याची खात्री करणे आणि त्यांचे संनियंत्रण करणे.

iii) अ) कार्यबळ समितीने अंमलबजावणीसाठी प्रस्तावित केलेल्या चौकटी/ कार्यपध्दतींना मान्यता देणे.

ब) कार्यबळ समितीने प्रस्तावित केलेल्या प्रत्येक उपक्रमशीलतेकरिता कालमर्यादा आणि लक्ष्यांक निश्चित करणे.

क) या धोरणाशी संबंधित बाबींसंदर्भात आंतरविभागीय समन्वय साधणे.

iv) धोरणातील महत्त्वाच्या बाबींसंदर्भातील सांख्यिकी माहितीच्या आधारावर धोरणाच्या अंमलबजावणीचे परिणामकारक विश्लेषण आणि मूल्यमापन करणे.

v) हरित माहिती तंत्रज्ञान उद्यानांना तसेच त्यातील घटकांना सुलभरित्या पर्यावरणाशी संबधीत परवानगी व इतर सवलती मिळविण्याकरिता पर्यावरण विभागाशी विचार विनिमय करून निकष ठरविणे.

vi) सर्व स्तरांवर असलेले अंमलबजावणीबाबतचे प्रश्न सोडविणे.

vii) माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा तसेच माहिती तंत्रज्ञान उद्यानात अनुज्ञेय पुरक सुविधांच्या यादीचा आढावा घेणे व त्यात योग्य त्या सुधारणा करणे. तसेच धोरणाच्या अनुषगांने interpretention संदर्भात संभ्रम निर्माण झाल्यास, त्यावर निर्णय देणे.

viii) या धोरणात नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या आधारे अतिरिक्त चटई क्षेत्राकरिता अधिमूल्य आणि अन्य अटी व शर्ती निश्चित करणे आणि या संबंधात स्थानिक स्वराज्य संस्था आणि

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ सारख्या सार्वजनिक संस्था व विशेष नियोजन प्राधिकरण सध्या अवलंबित असलेल्या प्रथांशी मेळ घालणे.

ix) खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान, माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योग यांना त्यांनी उपभोगलेल्या प्रोत्साहनांच्या निर्बंधातून मुक्त होऊन बर्हिगमन करावयाचे असल्यास अधिमुल्य निश्चित करुन व अटि व शर्ती निश्चित करणे.

x) सर्वात चांगल्या प्रथांचा (बेस्ट प्रॅक्टीसेस) आढावा घेणे.

xi) धोरणाची अंमलबजावणी व परिणामकारकता याबाबत शक्तीप्रदान समिती प्रत्येक ६ महिन्याला आढावा घेईल. आवश्यकता भासल्यास सुधारणा, बदल अथवा दुरुस्ती करण्यात येईल.

**१०.४.३ अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण :-**

उपरोक्त समितीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा आढावा व संनियंत्रण सामूहिक प्रोत्साहन योजनांतर्गत राज्यपातळीवरील समिती करेल, व याबाबतचा अहवाल वेळोवेळी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सदर शक्ती प्रदान समितीला सादर करेल.

**११. माहिती तंत्रज्ञान धोरणाची प्रयोज्यता व वैधता** (Applicability & Validity)

ज्या उद्यानांना /घटकांना या धोरणांतर्गत लाभ / प्रोत्साहने मंजूर करण्यात आली असतील त्यांना ती ज्या कालावधीसाठी मंजूर करण्यात आली असतील त्या कालावधीसाठी हे धोरण संपुष्टात आले तरी देय राहतील.

**१२. आर्थिक सवलतीच्या संदर्भातील तरतुदी :-**

या धोरणांतर्गत द्यावयाच्या आर्थिक सवलतीच्या संदर्भात स्वतंत्र लेखाशीर्ष उघडून त्याअंतर्गत आवश्यक ती अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास तसेच सदर प्रयोजनाअंतर्गत माहिती तंत्रज्ञान उद्यान घटकांना प्रोत्साहने द्यावयाची असल्याने सदर तरतूद योजने (Non-Plan) मधून करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

या संदर्भात नवीन लेखाशीर्ष उघडणे, सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता रु २५ कोटीचा निधी उपलब्ध करुन देणे इत्यादी बाबत वित्त विभागाशी सल्लामसलत करुन उद्योग विभागामार्फत धोरणांतर्गत विविध आर्थिक सवलती, पात्रता, निकष, निधी वाटपाची कार्यपध्दती, मार्गदर्शक तत्वे स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

**१३. कालावधी :-** माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २००९ दिनांक ३० जून, २०१५ रोजी संपूष्टात येत असून, नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५ दिनांक १ जुलै, २०१५ पासून लागू करण्यात येत आहे व या धोरणाचा कालावधी दि. ३० जून, २०२० पर्यंत राहिल.

**१४.** मा. मंत्रीमंडळाने दिलेली मान्यता विचारात घेऊन, या शासन निर्णयातील संबंधित तरतुदींच्या संदर्भात मंत्रालयीन विविध विभागाकडून स्वतंत्रपणे शासन निर्णय / अधिसूचना निर्गमित करणे अपेक्षित आहे. त्या संबंधित यादी या शासन निर्णयासोबत **परिशिष्ट-२** मध्ये नमूद करण्यात आली असून, स्तंभ २ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयाच्या परिच्छेदामधील निर्णय विचारात घेऊन

स्तंभ ४ मध्ये नमूद केलेल्या विभागाकडून तत्संबधी आदेश / मार्गदर्शक तत्वे/ शासन निर्णय /विकास नियंत्रण नियमावलीत सुधारणा / अधिसूचना निर्गमित करण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

**१५.** या शासन निर्णयानुसार सर्व संबंधीत विभागांनी आवश्यक ते आदेश/अधिसुचना त्वरीत निर्गमित कराव्यात.

**१६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०८२५११२५०११७१० आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Apurva Urvesh Chandra

Digitally signed by Apurva Urvesh Chandra
DN: c=IN, o=All India Services, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Apurva Urvesh Chandra
Date: 2015.08.26 15:12:08 +05'30'

**(अपूर्व चंद्रा)**
प्रधान सचिव (उद्योग)

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (अत्यावश्यक सेवा विषयी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.सचिव (मदतकार्य व पुर्नवसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई.
१७.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१८. महानगरपालिका आयुक्त, महानगर पालिका (सर्व)
१९.संचालक, नगररचना व मूल्यनिर्धारण, पुणे,
२०.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई.
२१.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विद्युत वितरण कंपनी (महावितरण), प्रकाशगड, वांद्रे ( पूर्व), मुंबई-४०० ०५१

२२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी (महापारेषण) प्रकाशगंगा, वांद्रे ( पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मीती (महानिर्मीती) प्रकाशगड, वांद्रे ( पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विकास अभिकरण, म्हाडा कमर्शिअल कॉम्पलेक्स, २ रा मजला, त्रिदल नगरच्या समोर, ऐरवडा, पुणे ४११ ००६.
२५. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई.
२६. विभागीय आयुक्त, पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती/मुंबई.
२७. जिल्हाधिकारी (सर्व)
२८. विरोधी पक्षनेते विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
२९. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
३०. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
३१. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
३२.मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३३.मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३४. सर्व मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३५. सर्व मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३६. महानिरीक्षक, नोंदणी व नियंत्रक, मुद्रांक शुल्क, पुणे.
३७. निमंत्रक, उद्योग मित्र, मुंबई.
३८. उद्योग सह संचालक (माहिती तंत्रज्ञान), उद्योग संचालनालय, मुंबई.
३९. संचालक, सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी पार्क्स ऑफ इंडिया, मुंबई/पुणे.
४०. उप महानिरीक्षक, मुंद्रांक शुल्क, मुंबई.
४१. उद्योग विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी.
४२. कक्ष अधिकारी (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४३. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४४. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
४५. उप सचिव (उद्योग-२) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
४६. निवड नस्ती (उद्योग-२), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट-१

**उद्दोग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक आयटीपी-२०१३/(प्र.क्र.२६५)/उद्योग-२, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ सोबतचे धोरण :-**

**महाराष्ट्राचे माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५**

**१. प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाने सन १९९८ मध्ये पहिले माहिती तंत्रज्ञान धोरण जाहीर केले होते. त्यानंतर रोजगार निर्मिती, कार्यक्षमतेत वाढ व जीवनमान सुधारण्यासाठी माहिती तं त्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००३ व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००९ जाहीर करण्यात आले होते. सध्या प्रचलित असलेले माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२००९ हे दिनांक २९ ऑगस्ट-२००९ रोजी जाहीर करण्यात आले.

राज्याचे माहिती तंत्रज्ञान धोरणांमुळे गेल्या दशकात राज्यातील माहिती तंत्रज्ञान क्षेत्राने मोठी झेप घेतली आहे. सन २००४ या आर्थिक वर्षात भारतात माहिती तंत्रज्ञान क्षेत्राने निर्माण केलेला रोजगार ८,३०,००० इतका होता. तो सन २०१४ मध्ये ३१,३२,००० पर्यंत वाढला आहे. म्हणजेच वित्तिय वर्ष २०१४ पर्यंत रोजगारात ४ पट वाढ झालेली आहे. सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी पार्क्स ऑफ इंडिया (एसटीपीआय) च्या आकडेवारीनुसार, सन २००३ या आर्थिक वर्षामध्ये या क्षेत्रातील राज्यातून झालेली निर्यात रु.५,५०८ कोटी होती, ती सन २०१३ मध्ये रु. ४९,७९६ कोटी पर्यंत वाढली आहे. म्हणजेच त्यात ८०० टक्के वाढ झालेली आहे. देशाच्या निर्यातीमध्ये महाराष्ट्रातील माहिती तंत्रज्ञान क्षेत्राचा वाटा २०% इतका आहे. एसटीपीआयच्या अहवालानुसार देशातील माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात राज्याच्या एकूण कामगिरीचा विचार करता दुसरा क्रमांक आहे.

एसटीपीआयच्या अहवालानुसार निर्यातीत अग्रगण्य असणाऱ्या राज्यांची सांख्यिकी माहिती खालीलप्रमाणे आहे.

| राज्य | **२००७-०८ (रु. कोटी)** | **२००८-०९ (रु.कोटी)** | **२००९-१० (रु. कोटी)** | **२०१०-११ (रु. कोटी)** | **२०११-१२ (रु. कोटी)** | **२०१२-१३ (रु. कोटी)** |
|---|---|---|---|---|---|---|
| कर्नाटक | ५६००० | ७०३७५ | ६७१०० | ७०२४१ | ८२११० | ९५०४८ |
| महाराष्ट्र | ३५७०४ | ४२९८० | ४५७०९ | ४९८७४ | ४६२६२ | ४९७९६ |
| तामिळनाडू | २८४२६ | ३६६८० | २६३६३ | २८२९० | २९०८२ | २९१८३ |
| आंध्रप्रदेश | २६१२२ | ३२५०९ | २७६६६ | २८६७५ | २८९४८ | ३४४९२ |
| भारत | १८०१५५ | २०२५८० | २०५५०५ | २१५२६४ | २२६७१२ | २५१४९८ |

सन २००१ पासून खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांची संकल्पना अस्तित्वात आली. माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण – २००३ च्या धोरण कालावधीमध्ये राज्यात २५३ खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांना इरादापत्र देण्यात आले व त्या व्दारे ३.९ दशलक्ष चौरस मीटर इतके बांधीव क्षेत्र माहिती तंत्रज्ञान घटकांसाठी प्रस्तावित करण्यात आले. तसेच माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण – २००९ च्या धोरण कालावधीमध्ये राज्यात नविन २१२ खासगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांना इरादापत्र देण्यात आले व त्याव्दारे ८.९३ दशलक्ष चौरस मीटर इतके बांधीव क्षेत्र प्रस्तावित करण्यात आले. एकूण ४६५ खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांमधील १२.८३ दशलक्ष चौरस मीटर इतके बांधीव क्षेत्र माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांसाठी उपलब्ध होवू शकेल. या व्यतिरिक्त या दोन धोरणांच्या कालावधीत एकूण ३७ सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्याने अधिसूचित करण्यात आली. ही उद्याने महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, सिडको व सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजी पार्क्स ऑफ इंडिया यांच्याव्दारे विकसित करण्यात येत आहेत.

मागील धोरणे राबवितांना आलेला अनुभव आणि माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात होत असलेल्या अलीकडील बदलांना सामोरे जाण्यासाठी नवीन माहिती तंत्रज्ञान धोरणाची तातडीची गरज भासली आहे. ज्या योगे राज्यातील माहिती तंत्रज्ञान उद्योग क्षेत्राला उभारी देऊन त्यांना बदलत्या जागतिक कलांना सामोरे जाण्यास सक्षम बनविता येईल.

प्रस्तुत माहिती तंत्रज्ञान धोरणाचा दस्ताऐवज तयार करण्यासाठी, माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील विविध भागधारकांशी वेळोवेळी चर्चा करण्यात आली. सदर चर्चेच्या निष्कर्षाच्या आधारे आणि या पूर्वीची माहिती तंत्रज्ञान धोरणे राबवितांना विभागाला आलेल्या अनुभवा च्या आधारे, प्रस्तुत धोरणाचा मसुदा तयार करण्यात आला आहे.

२. **दृष्टीकोन, अभियान, उद्दिष्टे व लक्ष्यांक :-**

i) **दृष्टीकोन :-** महाराष्ट्र जागतिक-स्तरावर एक सर्व समावेशक वाढीचे स्पर्धात्मक माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा केंद्र म्हणून विकसित करणे आणि राज्याला भारताची बौध्दीक व ज्ञानाची राजधानी म्हणून स्थापित करणे.

ii) **अभियान :-** जागतिक स्तरावरील गुंतवणूकदारांकरीता सर्वाधिक पसंतीच्या ठिकाणांमध्ये महाराष्ट्राचा समावेश करणे. तसेच प्रवर्तन नितीव्दारे स्पर्धात्मक आणि शाश्वत गुंतवणूकीस योग्य वातावरण असलेले राज्य म्हणून विकसित करुन महाराष्ट्राला सर्वाधिक पसंतीचे, आर्थिक आकर्षणाचे केंद्र बनविणे.

iii) **उद्दिष्टे :-** माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०१५ ची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे-

अ) महाराष्ट्राचे माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा क्षेत्रातील अग्रस्थान कायम राखणे.

ब) राज्यातील औद्योगिकदृष्टया कमी विकसित भागात आणखी गुंतवणूकीचा ओघ वाढविण्यासाठी चालना देणे.

क) राज्याच्या सर्व भागातील, समाजाच्या सर्व स्तरातील शिक्षित तरुणांना अधिक रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देणे.

ड) निर्यात उलाढालीतील उच्च पातळी गाठून त्याव्दारे राज्याच्या स्थुल घरगुती उत्पादनात आणि उत्पादकतेत वाढ घडवून आणणे.

इ) राज्याच्या सामाजिक व आर्थिक विकासाकरिता एक साधन म्हणून माहिती तंत्रज्ञान क्षेत्राचा वापर करणे.

फ) मूळ सामुग्री निर्मितीसह नवीन उत्पादन व बिझनेस टु बिझनेस आणि बिझनेस टु कस्टमर यांना पुरविल्या जाणाऱ्या अव्दितीय सेवांकरिता बौध्दीक मत्ता निर्मितीस प्रोत्साहन देणे.

iv) **धोरणाचे लक्ष्यांक :-**

माहिती तंत्रज्ञान धोरणाच्या उद्दिष्टांना अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे लक्ष्यांक निश्चित केले आहेत.

- खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने आणि माहिती तंत्रज्ञान, माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा, ए.व्ही.जी.सी. घटक याद्वारे राज्यात रु.५०,००० कोटींची गुंतवणूक आकर्षित करणे.
- १० लाख इतका नवीन रोजगार निर्माण करणे.
- महाराष्ट्र राज्यातून माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा / ए.व्ही.जी.सी. या क्षेत्रातून होणारी वार्षिक निर्यात रु.१ लाख कोटी पर्यंत वाढविणे.

**३. धोरणाची कार्यतंत्रे :-**

**i)** राज्यातील सर्व भागात माहिती तंत्रज्ञान उद्योगाचा प्रसार करणे :- राज्यातील सर्व जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी माहिती तंत्रज्ञान उद्योगांना अधिक प्रोत्साहने देऊन त्याव्दारे गुंतवणूक आकर्षित करणे आणि माहिती तंत्रज्ञान धोरण २००९ अन्वये देण्यात येत असलेली सर्वसाधारण प्रोत्साहने कायम ठेवणे.

**ii)** **विशिष्ट क्षेत्राचा विकास** :- राज्याचे बलस्थान असणाऱ्या ए व्ही जी सी (ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स ) यासारख्या विशिष्ट क्षेत्रांचा विकास करण्यासाठी पुढाकार घेणे. सार्वजनिक सेवा वितरण तसेच अभियांत्रिकी संशोधन व विकास यासारख्या सेवा, आधारकार्ड आधारित ॲप्लिकेशन्सचा वापर करुन पुरविण्यास प्रोत्साहन देणे.

**iii)** **हरीत माहिती तंत्रज्ञानाचा विकास** :- माहिती तंत्रज्ञान क्षेत्राची वाढ जबाबदारीपुर्वक आणि शाश्वत पर्यावरण राखणारी असल्याची खात्री करुन घेणे.

**iv)** **उद्योजकता आणि नाविन्याकरिता पुढाकार घेणे** :- राज्यभरात ज्ञान केंद्र / रिसोर्स सेंटर आणि इन्क्युबेशन सेंटर्स स्थापन करण्यासाठी पुढाकार घेणे.

**v)** **महाराष्ट्र ब्रॅन्ड विकसित करणे** :- माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील गुंतवणूकीसाठी महाराष्ट्र एक किफायतशीर ठिकाण म्हणून नावारुपास आणणे.

**vi)** **ग्रामीण व निमशहरी भागात बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंग क्षेत्राचे प्रसारण करण्यासाठी पुढाकार घेणे** :- बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंग क्षेत्रामध्ये रोजगार निर्माण करण्याची प्रचंड क्षमता आहे. ग्रामिण व निमशहरी भागात संगणक क्षेत्राच्या तीव्रता वाढविण्यासाठी संगणक क्षेत्रातील कुशल मनुष्यबळाला त्यांच्या राहत्या ठिकाणीच रोजगार उपलब्ध करुन देण्यात येईल.

**vii)** **डेटा सेंटर्स विकसित करणे** :- आशिया- पॅसिफिक विभागात मुंबई डेटा सेंटर सेवा बाजारपेठ म्हणून झपाटयाने विकसित होत आहे. वाढती मागणी विचारात घेवून को-लोकेशन आणि होस्टींग सर्व्हिसेस तसेच ॲज-अ-सर्व्हिस ऑफरिंगस देण्यासाठी पुरवठादार तयारी करत आहेत. या क्षेत्रामध्ये गुंतवणूकीसाठी व प्रशिक्षित मनुष्यबळास रोजगार पुरविण्यासाठी चांगली क्षमता आहे.

## ४. व्याख्या

या धोरणाच्या संदर्भात, माहिती तंत्रज्ञान उद्योगांत माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर, माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर, माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा, माहिती तंत्रज्ञान वित्तीय सेवा, पुरक अथवा सहाय्यभूत सेवा आणि ए. व्ही.जी. सी. यांच्या व्याख्या खालीलप्रमाणे असेल.

**i)** **माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर** :- माहिती तंत्रज्ञान सॉफ्टवेअर म्हणजे स्त्रोत संकेतांक किंवा वस्तु संकेतांकासह सूचना, माहिती, ध्वनी किंवा प्रतिमा यांचे कोणतेही अभिवेदन, ज्यात वरील बाबींची नोंद

यंत्राने वाचण्या-योग्य स्वरुपात करणे आणि ज्यात उपयोगकर्त्यास कोणतेही परस्पर संस्करण संगणकाच्या माध्यमातून करता येणे.

ii) **माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर :-** माहिती तंत्रज्ञान हार्डवेअरमध्ये उद्योग संचालनालयाने वेळोवेळी अधिसूचित केलेल्या उत्पादनांचा समावेश असेल. त्यांची सूचक यादी परिशिष्ट-अ मध्ये देण्यात आली आहे.

iii) **माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा :-** मा. तं. सहाय्यभूत सेवा म्हणजे केंद्रीय प्रत्यक्ष कर मंडळाने **(Central Board of Direct Taxes)** वेळोवेळी आयकर - नियमाच्या कलम – 10 TA अन्वये निर्देशित केलेल्या आणि शासनाने निश्चित केलेल्या सेवा असतील आणि त्यामध्ये खालील सेवांचा समावेश असेल.

- बॅक-ऑफीस ऑपरेशन्स
- कॉल सेंटर्स किंवा कॉन्टेक्ट सेंटर सर्व्हिसेस
- कंटेंट डेव्हलपमेंट किंवा ॲनिमेशन
- डेटा प्रोसेसिंग आणि डेटा माईनिंग
- अभियांत्रिकी आणि डिझाइन
- भौगोलिक माहिती प्रणाली सेवा
- मानव संसाधन सेवा
- इन्शुरन्स क्लेम प्रोसेसिंग
- लिगल डेटाबेस
- वैद्यकीय प्रतिलेखन (मेडिकल ट्रान्सक्रिप्शन) निर्मीती व देखभाल (वैद्यकीय सल्ला वगळून)
- वेतनपट (पेरोल)
- दुरस्थ परिरक्षण (रिमोट मेटेनन्स)
- महसुल लेखा (रेव्हेन्यु अकांउटींग)
- सपोर्ट सेंटर्स
- वेबसाईट सेवा
- भाषांतर सेवा
- डेटा सर्च इंटिग्रेशन आणि ॲनालिसिस
- रिमोट एज्युकेशन (एज्युकेशन कंन्टेट डेव्हलपमेंट वगळून) किंवा
- क्लीनीकल डेटा बेस मॅनेजमेंट सर्व्हिसेस (क्लिनीकल ट्रायल्स वगळून), यामध्ये रिसर्च आणि डेव्हलपमेंट सर्व्हिसेस ज्या कॉन्ट्रेक्ट रिसर्च आणि डेव्हलपमेंट सर्व्हिसेसच्या स्वरुपात असतील किंवा नसतील त्यांचा समावेश नसेल.

आयकर नियमामध्ये कोणताही बदल झाल्यास सेवांच्या यादीत आवश्यक ते बदल करण्याचा निर्णय राज्य शासन घेईल. ज्या प्रकरणांमध्ये माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक, माहिती तंत्रज्ञान उद्याने, माहिती तंत्रज्ञान सेझ, माहिती तंत्रज्ञान एव्हीजीसी पार्क यांना, उद्योग संचालनालय किंवा त्यांचे क्षेत्रीय कार्यालयंनी इरादापत्र अथवा नोंदणीपत्र निर्गमित केले असल्यास, सदर प्रकरणामध्ये मंजूर करण्यात आलेले प्रोत्साहने धोरण कालावधीत कायम राहतील. वरील व्याख्येप्रमाणे माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा ॲक्टीव्हिटी करित असलेले घटक सुध्दा अस्तित्वातील माहिती तंत्रज्ञान उद्यानांमध्ये स्थापित करता येतील.

iv) **पूरक सेवा / सुविधा :-** पूरक सुविधा म्हणजे माहिती तंत्रज्ञान व्यवसाय करण्यासाठी पूरक ठरणाऱ्या सुविधा होय**,** ज्यामध्ये पुढील बाबींचा अंतर्भाव नसेल.

- मॉल्स,
- सिनेमा थिएटर्स, सार्वजनिक सभागृहे आणि मल्टिप्लेक्सेस,

- आम जनतेकरीता विक्रीसाठी असलेल्या रहिवासी सदनिका,
- संगणक आणि माहिती तंत्रज्ञान संबंधातील हार्डवेअर व सॉफ्टवेअर, वगळून इतर सर्व प्रकारच्या व्यापारी मालासाठीची शोरुम्स,
- १० पेक्षा जास्त बेड असलेली रुग्णालये अथवा शुश्रृषालये,
- शाळा, महाविद्यालये, प्रशिक्षण संस्था (माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा ट्रेनिंग इन्स्टीटयूटस या व्यतिरिक्त) आणि त्यांच्याशी संबंधित असलेली वसतिगृहे

वर व्याख्या करण्यात आलेल्या पूरक सेवा / सुविधा या अस्तिवातील माहिती तंत्रज्ञान उद्दयानांना सुध्दा अनुज्ञेय असतील.

v) **ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स (ए.व्ही.जी.सी.)**

- **ॲनिमेशन** – ॲनिमेशन हे, रेखाचित्रे, संगणक ग्राफिक्स, किंवा दोन अथवा तीन मितीय **(two or three dimensional objects)** वस्तुंची छायाचित्रे (जसे की, कठपुतळी, चिकणमातीची प्रतिकृती किंवा कागदाची कट-आऊट्स) इत्यादी वस्तूंच्या मालिकेचा वापर करून चित्रपट बनविण्याचा प्रभावी मार्ग आहे. ही चित्रे / वस्तु एकमेकांपेक्षा किंचित वेगळे असून ती एकापाठोपाठ एक जलद गतीने फिरवल्यानंतर हालचालीचा आभास निर्माण होतो. ॲनिमेशनमध्ये द्विमितीय/ त्रिमितीय **(2 D/ 3 D)** ॲनिमेशन, क्लेमेशन, पेपर ॲनिमेशन, स्टॉप मोशन, शॅडो ॲनिमेशन, हार्ड सर्फेस ॲनिमेशन इत्यादींचा समावेश असेल.

  ॲनिमेशन हे ॲनॉलॉग अथवा डिजिटल मिडीयावर मुद्रित केले जाऊ शकते.

- **व्हिज्युअल इफेक्ट्स** - व्हिज्युअल इफेक्ट्स ही लाईव्ह ॲक्शन शॉट संदर्भात बाहय फेरफार करुन कल्पनाचित्र बनवून चित्रपट तयार करण्याची प्रक्रिया आहे. व्हिज्युअल इफेक्ट्समध्ये लाईव्ह ॲक्शन व कल्पनाचित्र यांच्या एकात्मिकरणाव्दारे निर्माण केलेले, वास्तववादी वाटणारे परंतु सरळ चित्रीकरण करण्यासाठी धोकादायक, अव्यवहार्य व अशक्य असणारे वातावरण तयार करुन फिल्म बनविण्यात येते. व्हिज्युअल इफेक्ट्समध्ये किफायतशीर व वापरास सुलभ असलेले ॲनिमेशन आणि कॉम्पोजिटींग सॉफ्टवेअरचा वापर करुन तयार केलेली प्रतिमाचित्रांचा समावेश होतो.

  व्हिज्युअल इफेक्टस् मध्ये रोटोस्कोपी, डिजिटल क्लीनअप, व्हीएफएक्स पेंट, मॉर्फींग, डिजिटल मॅटे पेंटीग (डीएमपी), क्रोमा की, कम्पोझिटींग, ट्रॅकींग, प्रीव्हीज्युअलायझेशन, प्रेप वायर रिमुव्हल, ब्युटीपास, फेस ॲण्ड बॉडी रिप्लेसमेंट, मॉडेलिंग, शेडर्स, टेक्स्चरींग, लायटींग, ॲनिमेशन, रिगिंग, मॅचिंग, एफएक्स (क्लाऊड, लिक्वीड, रेन, वॉटर, डस्ट, स्मोक, विंड, फायर, फ्लेम, ब्लास्ट, स्नो, आइस, इत्यादी) पार्टीकल सिम्युलेशन, सिम्युलेशन- (फर, हेअर, क्लोथ, क्राऊड, डिस्ट्रक्शन इत्यादी), बॅकग्राऊंड आणि सेट क्रियेशन ॲण्ड एक्सटेंशन, डिजिटर एनवायरमेंट क्रिएशन, मिनीएचर्स फॉर व्हीएफएक्स, इमेज प्रोसेसिंग, डीआय, कलर करेक्शन इत्यादीचा समावेश असेल.

- **गेम** –डिव्हाइसवर मानवी आंतरक्रीयेव्दारे युजर इंटरफेसचा वापर करुन दृश्यमान प्रतिसाद निर्माण करुन दंग होण्याचा (इमर्सिव) अनुभव मिळण्याकरीता सुसंवाद साधण्याचा इलेक्ट्रॉनिक खेळ होय. गेममध्ये द्विमितीय, त्रिमितीय **(2 D, 3 D)**, व्हीडीओ, हँडहेल्ड डिवाईस, मोबाईल, व्हर्च्युअल, कन्सोल इत्यादींचा समावेश होतो.

- **कॉमिक्स** – हे एक कल्पना व्यक्त करण्याचे प्रतिमा दृश्य माध्यम असून, काही वेळा त्यात कल्पना / प्रतिमा हया मजकूर किंवा दृश्य माहिती, व्हॉईस, आवाज याचा एकत्रित वापर करुन व्यक्त केला जातो. कॉमिक्समध्ये हॅन्ड ड्रॉइंग, डिजिटल द्विमितीय, त्रिमितीय **(2 D, 3 D)**, मोशन ग्राफीक्स, मोशन कॉमिक्स यांचा समावेश होतो.

- **स्टीरिओ कनर्व्हजन** - स्टीरिओ कनर्व्हजन ही ॲनिमेशनमधील पोस्ट प्रॉडक्शन नंतरची विशिष्ट प्रक्रिया आहे ज्यात सामान्य दोन मीतीय (2 D) अथवा लाईव्ह ॲक्शन चित्रपटांचे रुपांतर स्टीरिओस्कोपिक स्वरुपात दंग होण्याचा (इर्मसिव) अनुभव मिळण्यासाठी करण्यात येते. स्टीरिओ कनर्व्हजनमध्ये रोटोस्कोपी, लेयर पेंटींग, डेप्थ ग्राइडींग, ट्रॅकींग, एलिमेंट कम्पोझिटींग, फायनलाइंग, एजिंग, पार्टीकल्स इत्यादीचा समावेश होतो.

व्हर्च्युअल रिॲलिटी, ॲग्युमेटेड रिॲलिटी, मोशन कॅप्चर, फेशियल कॅप्चर आणि परफॉमन्स कॅप्चर, थ्रीडी प्रिंटींग, थ्रीडी मॅपिंग, सिम्युलेशन, डिजिटल स्ट्रीमिंग आणि कनटेंट डिससेमिनेशन आणि रेनडरींग इत्यादी एव्हीजीसीचा भाग असतील.

**vi) डेटा सेंटर**

डेटा सेंटर ही एक अशी सुविधा आहे जिच्यामध्ये संगणक व्यवस्था व निगडीत घटक जसे की दूरसंचार आणि स्टोरेज प्रणाली ठेवण्यात येते. त्यामध्ये विज पुरवठा, डेटा कम्युनिकेशन जोडण्या, पर्यावरण नियंत्रण यंत्रणा (जसे की वातानुकूलन, अग्नी निरोधन) आणि सुरक्षाव्यवस्था यांचाही समावेश होतो. व्हॅल्यू चेनमध्ये रियल इस्टेट, बांधकाम, हार्डवेअर इक्विपमेंट, युटीलिटीज (वीज, पाणी, शितकरण), नेटवर्किंग व सॉफटवेअर आणि सेवा यासारख्या मिश्र खंडाचा समावेश होतो.

माहिती तंत्रज्ञान घटकांच्या व्याख्येमध्ये माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूर संचार हार्डवेअर उत्पादक घटक, माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा (आयटीईएस) आणि सॉफ्टवेअर उद्योग ज्यामध्ये सेवांचाही समावेशअसेल. एव्हीजीसी घटक हे माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा म्हणून वर्गीकृत करण्यात येतील.

**५. धोरणातील पुढाकार :-**

माहिती तंत्रज्ञान धोरणातील कार्यतंत्रांमुळे राज्याकरिता कुशल मनुष्यबळ विस्तार करणे माहिती तंत्रज्ञानासाठी पायाभूत सोयी-सुविधा निर्माण करणे आणि नाविन्य व उद्योजकतेची जोपासना करुन दीर्घ-कालिन मत्ता निर्माण करण्याच्या राज्याच्या प्रतिबध्दतेला दिशा मिळणार आहे. ही तंत्रे खालीलप्रमाणे विशिष्ट पुढाकार आणि प्रोत्साहनाव्दारे अंमलात आणण्यात येतील.

अ) माहिती तंत्रज्ञान उद्याने/ माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र (सेझ) / ए.व्ही.जी.सी पार्क या साठी तरतूदी आणि प्रोत्साहने

ब) माहिती तंत्रज्ञान घटकांसाठी तरतूदी आणि प्रोत्साहने

क) ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स (ए. व्ही. जी. सी.) या क्षेत्रास उद्युक्त (Promote) करणे.

ड) ग्रामिण व निमशहरी भागात बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंग (बी.पी.ओ.) या उपक्रमांच्या वाढीस उद्युक्त करणे.

इ) डेटा सेंटर्सचे प्रवर्तन

फ) माहिती तंत्रज्ञान संबंधित इनक्युबेशन सुविधा

ग) हरित माहिती तंत्रज्ञानाला प्रोत्साहीत करणे

ह) व्यवसाय सुलभीकरणाच्या संदर्भात कायद्यात बदल करण्यास पुढाकार

ई) मनुष्यबळ विकास

ज) प्रशासकीय उपाययोजना

**A. माहिती तंत्रज्ञान उद्याने/ माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र (सेझ)/ ए.व्ही.जी.सी. पार्क यासंबंधी तरतूदी आणि प्रोत्साहने :-**

माहिती तंत्रज्ञान समूह घटक / सहाय्यभूत सेवा घटक यांना दर्जेदार पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी माहिती तंत्रज्ञान उद्यान, हे प्रभावी साधन असल्याचे सिद्ध झाले आहे. महाराष्ट्र शासनाने संपूर्ण राज्यात सार्वजनिक तसेच खाजगी क्षेत्रात माहिती तंत्रज्ञान उद्याने विकसित करण्यास प्रोत्साहित केले आहे. या धोरणाव्दारे सुध्दा खालील प्रोत्साहने व तरतुदी अंमलात राहणार आहेत.

**i) माहिती तंत्रज्ञान उद्यानाकरिता अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक व जागेचा वापर** –:-

जमीनीची दिवसेंदिवस होत असलेली कमतरता तसेच जमीनीच्या किंमतीमध्ये सातत्याने होणारी वाढ त्यामुळे बांधीवक्षेत्राची (Built up Space) किंमत याचा परिणाम वाढीवर होत आहे. जागेची वाढती किंमत हा माहिती तंत्रज्ञान उद्योग वाढीस अडथळा ठरत आहे. उद्योजकांना किफायतशीर दराने बांधीव क्षेत्र उपलब्ध होण्यासाठी मूळ चटईक्षेत्र निर्देशांकावर अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय करण्यात येईल.

अ) **१०० टक्क्यांपर्यंत अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देणे :-** उद्योग संचालनालयाने या धोरणान्वये (Present Policy) तसेच या पूर्वी माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणा अंतर्गत स्थापन करण्यास मान्यता दिलेल्या सर्व नोंदणीकृत सार्वजनिक व खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने, एव्हीजीसी उद्याने माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रे किंवा विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्याने आणि सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्याने उद्यानातील एकाकी घटक यांना अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता, खालीलप्रमाणे १०० टक्क्यांपर्यंत अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देण्यात येईल.

- पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर या महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद आणि राज्यातील विना उद्योग जिल्हे तसेच नक्षलग्रस्त भाग (सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अन्वये घोषित केलेले) वगळून इतर सर्व ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या १० टक्के अधिमूल्य आकारुन,
- पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद या ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या ३० टक्के अधिमूल्य आकारुन

ब) **१०० टक्क्यांच्या वर आणि २०० टक्क्यांपर्यंत अतिरिक्त चटईक्षेत्र :-** उद्योग संचालनालयाने या धोरणांतर्गत (Present Policy) तसेच पूर्वीच्या माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणा अंतर्गत स्थापन करण्यास मान्यता दिलेल्या आणि किमान १८ मीटर रुंदीचा जोड रस्ता उपलब्ध असणाऱ्या सर्व नोंदणीकृत सार्वजनिक व खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने, एव्हीजीसी उद्याने, माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रे किंवा विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्याने आणि सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील एकाकी घटक यांना अधिमूल्य आकारुन किंवा न आकारता, खालीलप्रमाणे १०० टक्क्यांच्यावर आणि २०० टक्क्यांपर्यंत अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक उपलब्ध करुन देण्यात येईल.

- पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर या महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद आणि राज्यातील विना उद्योग जिल्हे तसेच नक्षलग्रस्त भाग (सामुहिक प्रोत्साहन

योजना-२०१३ अन्वये घोषित केलेले) वगळून इतर सर्व ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या १० टक्के अधिमूल्य आकारुन,

- पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद या ठिकाणी प्रचलित रेडीरेकनर दराच्या ३० टक्के अधिमूल्य आकारुन,

टिप :- मूळ चटई क्षेत्र निर्देशांक १.०० पेक्षा जास्त असला तरी १०० % अथवा २००% अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक धरुन एकूण चटई क्षेत्र निर्देशांक ३.०० पेक्षा जास्त अनुेय असणार नाही.

क) तथापि, राज्यातील विना उद्योग जिल्हे तसेच नक्षलग्रस्त भाग (सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अन्वये घोषित केलेले) यास वरील परिच्छेद ५(अ) (i) (अ) आणि (ब) नुसार खाजगी व सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानासाठी अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशाकांकरिता कोणतेही अतिरिक्त अधिमूल्य आकारले जाणार नाही.

ड) पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद या ठिकाणच्या सार्वजनिक तसेच खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याने/ एव्हीजीसी उद्याने यांना वरील परिच्छेद क्र. ५ (अ) (i) (अ), आणि (ब) मध्ये नमूद क्षेत्रांसाठी कमाल २०% पर्यंत बांधकाम क्षेत्रफळ (पार्किंग क्षेत्र वगळून) पुरक सुविधांसाठी अतिरिक्त चटई क्षेत्रासही अनुज्ञेय राहील.

इ) परिच्छेद ५ (अ) (i) (ड) मध्ये नमूद केलेल्या राज्यातील क्षेत्राव्यतिरिक्त इतर सर्व ठिकाणी कमाल ४०% पर्यंत बांधकाम क्षेत्रफळ (पार्किंग क्षेत्र वगळून) पुरक सुविधांसाठी अतिरिक्त चटई क्षेत्रासही अनुज्ञेय राहील.

अतिरिक्त चटई निर्देशांक, अधिमुल्य व जागेच्या वापरासंबंधी वर नमूद तरतूदी सध्या अस्तित्वात असलेल्या माहिती तंत्रज्ञान उद्यानांनाही लागू असतील.

**ii) एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरांची (आयआयटीटी) उभारणी :-**

माहिती तंत्रज्ञान उद्योग आणि त्यातील कामगार यांना त्यांची गरज विचारात घेवून, त्यांना आवश्यक त्या सुखसोयी व निवासाची व्यवस्था उपलब्ध करुन देण्यासाठी सदर धोरणा अंतर्गत एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरांची उभारणी करणेबाबतची योजना संकल्पित आहे. एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरांची उभारणी संदर्भातील निकष सविस्तरपणे या धोरणा सोबतच्या अनुसूची 'ब' मध्ये –दर्शविले आहे. जागतिक कल विचारात घेवून एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरे " स्मार्ट सिटीज " म्हणून विकसित करण्यात येतील.

एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरातील माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना लाभ / प्रोत्साहने उपरोक्त परिच्छेद ५ (ब) मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील. चटई क्षेत्रासाठी अधिमूल्य वरील परिच्छेद ५ (A) (i) (a), (b) व (c) प्रमाणे आकारले जाईल. मात्र पुणे प्राधिकरण विभाग व मुंबई प्राधिकरण विभागाअंतर्गत पुणे, पिंपरी-चिंचवड, बृहन्मुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाइंदर, उल्हासनगर हया महानगरपालिका आणि अंबरनाथ नगरपरिषद क्षेत्राबाहेर रेडी रेकनर दराच्या २० टक्के दराने लागु राहील. राज्याच्या कोणत्याही भागात एकात्मिक माहिती तंत्रज्ञान नगरे उभारता येऊ शकतील.

**iii) विद्युत दर :-** उद्योग संचालनालय / विकास आयुक्त (सेझ) यांनी माहिती तंत्रज्ञान उद्यानांना नोंदणी दिल्यानंतर खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील सामायिक सेवा / पूरक सेवा क्षेत्रातील घटकांनी वापरलेल्या सामायिक सेवा वगळून इतर घटकांनी वापरलेल्या सामायिक

सेवांच्या संदर्भात (जसे की, लॉबी, मध्यवर्ती वातानुकुलित प्रणाली, उद्वाहने (लिफ्ट्स) / सरकते जिने (एसकेलेटर्स), सामायिक सांडपाणी प्रक्रिया सयंत्र, वॉशरुम्स इत्यादी) वीजेची आकारणी औद्योगिक दराने करण्यात येईल. परंतु त्यासाठी विकासकानी प्रत्येक माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना भाडे पट्टयाने अथवा विकत घेतलेल्या जागेसाठी स्वतंत्र विद्युत मीटर पुरविणे आवश्यक राहील.

iv) **विद्युत पुरवठा व्यवस्था / विद्युत उपकेंद्र :-** माहिती तंत्रज्ञान उद्यानामधील एकूण बांधकाम क्षेत्र विचारात घेऊन किमान ६ वॅट प्रति चौ. फूट याप्रमाणे विकासकाने विद्युत पुरवठा व्यवस्था / विद्युत उपकेंद्र उभारण्याची तरतूद करणे आवश्यक राहील. ही तरतूद अस्तित्वातील माहिती तंत्रज्ञान उद्यानांनाही लागु राहील.

v) **पायाभूत सुविधांच्या विकासासाठी प्रोत्साहने :-**
**माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधीची निर्मीती :-**

राज्य शासन व नियोजन प्राधिकरणे खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांकडून या धोरणाच्या परिच्छेद ५ A (i) व ५ A (ii) मध्ये नमूद तरतुदीनुसार अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशाकांपोटी मिळणाऱ्या अधिमूल्याच्या रकमेचा “माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी” या एका स्वतंत्र निधीची निर्मीती करतील व या निधीचा विनियोग केवळ माहिती तंत्रज्ञान उद्योगासाठी आवश्यक असणाऱ्या पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच करण्यात येईल.

राज्य शासन आणि नागरी स्थानिक संस्थांच्या महामार्गांना जोडण्यासाठी उच्च प्रतीचे रस्ते बांधण्याच्या संदर्भातील गुंतवणुकीस पुरक अशी गुंतवणूक करण्यास, खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानांच्या विकासकांना परवानगी राहील. असे रस्ते बांधण्याचे काम पूर्ण झाल्यावर विकासकांकडून नागरी स्थानिक संस्थांना/ राज्य सार्वजनिक बांधकाम विभाग/ जिल्हा परिषद किंवा इतर एजन्सी ज्यांच्या मालकीचा रस्ता आहे त्यांना तो रस्ता हस्तांतरित करण्यात येईल.

नागरी स्थानिक संस्थांना/ राज्य सार्वजनिक बांधकाम विभाग/ जिल्हा परिषद किंवा इतर एजन्सी ज्यांचा मालकीचा तो रस्ता आहे त्या रस्ता बांधणीच्या खर्चाच्या मुल्यांकन / पडताळणी करतील आणि विकासकानी केलेल्या अशा गुंतवणुकीचा परतावा “माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी” या निधीमधील उपलब्ध रकमेतून अतिरिक्त चटईक्षेत्र मिळविण्यासाठी भरलेल्या अधिमुल्याच्या रकमेच्या मर्यादेत करण्यात येईल.

शक्तीप्रदान समितीच्या अंतर्गत एक उपसमिती गठीत करण्यात येईल त्याची रुपरेषा पुढीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | **प्रधान सचिव (उद्योग), उ.ऊ व का.वि.** | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव/सचिव, न.वि.वि. (नवि-१ व नवि-२) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग | सदस्य |
| ४ | सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (रस्ते) | सदस्य |
| ५ | आयुक्त / मुख्याधिकारी – संबंधित नागरी स्थानिक संस्था | सदस्य |
| ६ | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय | सदस्य |
| ७ | उप सचिव (उद्योग), उ.ऊ व का.वि. | सदस्य सचिव |

ही समिती रस्त्यांच्या प्रकल्पांसंबंधी जलद गतीने निपटारा करणे, अंमलबजावणी आणि तत्संबंधित इतर बाबींवर निर्णय घेईल.

**vi) माहिती तंत्रज्ञान उद्यानातील बांधकाम जागेचा वापर, माहिती तंत्रज्ञाना वापर व्यतिरिक्त इतर बाबींसाठी वापर केल्यास दंड :-**

उद्योग संचालनालय एक वेब-पोर्टल विकसित करेल. त्या वेब पोर्टलवर प्रत्येक माहिती तंत्रज्ञान उद्यानाच्या विकासक, पार्कमधील माहिती तंत्रज्ञान /माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा आणि पूरक सेवांच्या घटकांची नावे, वापरलेले बांधकाम क्षेत्रफळ आणि करण्यात येत असलेल्या / हाती घेतलेल्या उपक्रमाची माहिती (activities), नोकरीस ठेवलेले मनुष्यबळ इ. विषयीची अद्यावत माहिती अर्धवार्षिक तत्वावर वेब-पोर्टलवर उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

ज्या खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाने माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरणातील तरतूदीनुसार अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांकाचा लाभ घेतला आहे आणि कालांतराने माहिती तंत्रज्ञान उद्यानातील बांधीव जागेचा वापर, बिगर माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा अथवा वाणिज्यिक कार्यासाठी किंवा माहिती तंत्रज्ञान धोरणांतर्गत अनुज्ञेय असलेल्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर प्रयोजनासाठी वापर करीत असल्याचे निदर्शनास आल्यास, खालील प्रमाणे दंडात्मक कारवाई केली जाईल आणि दंडाची रक्कम संबंधित नियोजन प्राधिकरण आणि शासन यांचेकडे ३:१ या प्रमाणात भरण्यात येईल.

अ) संबंधित खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाला उद्योग संचालनालय व ज्यांनी इमारत आराखडा मंजूर केला आहे असे नियोजन प्राधिकरण यांच्या अधिकारी वर्गाचा गट प्रत्यक्ष जागेला भेट देऊन, खात्री करेल.

ब) जे बांधीव क्षेत्र माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा व्यतिरिक्त इतर प्रयोजनासाठी ( Non IT/ITES Activities ) वापरले जात असेल, त्या बांधीव क्षेत्रासाठी प्रचलित रेडीरेकनर दराच्या ०.३ टक्के (तीन दशांश टक्के) प्रति दिवस इतकी रक्कम दंड म्हणून आकारली जाईल.

क) सदरचा दंड हा भोगवटा प्रमाणपत्र (ऑक्युपन्सी सर्टीफीकेट) निर्गमित झाल्याच्या तारखेपासून बिगर माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा यासाठी वापर सुरु असल्याचे तारखेपर्यंतच्या कालावधीसाठी वसूल केला जाईल.

ज्यांनी खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाच्या इमारती आराखडयास मंजूरी दिली आहे अशा संबंधित नियोजन प्राधिकाऱ्याकडे दंडांच्या रकमेचा भरणा केल्यावर संबंधित खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाने ज्या मूळ प्रयोजनासाठी इरादापत्र अथवा नोंदणीपत्र घेतले होते त्याच प्रयोजनासाठीच जागेचा वापर पुर्न:स्थापित करेल. जर संबंधित खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान यांनी दंडाची रक्कम भरण्यास आणि / अथवा जागेचा वापर मूळ प्रयोजनासाठी पुर्न:स्थापित करण्यास अपयशी ठरल्यास, संबंधित नियोजन प्राधिकरण, उद्योग संचालनालयास कळवून खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्याना विरुध्द महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ (MRTP Act) मधील तरतुदीनुसार उचित कार्यवाही करेल. ही तरतूद अस्तित्वातील माहिती तंत्रज्ञान उद्यानांनाही लागू राहील.

## B. माहिती तंत्रज्ञान माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांसाठी आर्थिक प्रोत्साहने :-

प्रस्तुत धोरणांतर्गत प्रस्तावित करण्यात आलेली सर्व आर्थिक प्रोत्साहने, स्वतंत्र (योजनेतर) अर्थसंकल्पिय तरतूदीतून देण्यात येतील. सदर निधीसाठी स्वतंत्र लेखाशीर्ष उघडून त्याअंतर्गत आवश्यक ती अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात येईल.

i) **मुद्रांक शुल्क सूट :-**

माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, मुद्रांक शुल्कात खालीलप्रमाणे सूट अनुज्ञेय राहील :-

**अ**) राज्यातील सी, डी, डी+, ना-उद्योग जिल्हे आणि नक्षलग्रस्त क्षेत्रातील सर्व माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, तारणगहाण, हडप, तारण, हक्कलेख निक्षेप, अभिहस्तांतरण पत्र, गहाण मालमत्तेवरील प्रभार, भाडेपट्टा, गहाणखत आणि गहाणखतावरील प्रतिभूति-बंधपत्र या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

ब) अ व ब प्रवर्ग क्षेत्रामधील सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील, नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक किंवा अस्तित्वातील घटकांचे विस्तारीकरण यासाठी , तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र आणि भाडेपट्टा या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

क) अ व ब प्र्वगामधील सार्वजनिक / खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील नविन व विद्यमान घटकांचे विस्तारीत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर व दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह) सेझमधील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान, माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र यांना तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र, भाडेपट्टा आणि सार्वजनिक अभिहस्तांकित भाडेपट्टा या व्यवहारांकरीता, मुद्रांक शुल्कात ७५ टक्के सूट देण्यात येईल.

ड) अ व ब प्रवर्ग क्षेत्रामधील विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्यानातील आणि माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रातील नविन व विद्यमान घटकांचे विस्तारीत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह) आणि अ आणि ब प्रवर्गामधील एसटीपीआयने मान्यता दिलेल्या नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान घटकांना तारणगहाण, हडप, तारण, विलेख, अभिहस्तांतरण पत्र व भाडेपट्टा आणि पब्लिक असाईमेंट लिझ या व्यवहारांकरीता मुद्रांक शुल्कात १०० टक्के सूट देण्यात येईल.

इ) मुंबई मुद्रांक अधिनियम १९५८ च्या कलम ६० अन्वये माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या अभिहस्तांकित भाडेपट्ट्यांना आणि कलम ३६-ए खाली माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या संमती व परवानगी करारनाम्यांना मुद्रांक शुल्कात ७५ टक्के सूट देण्यात येईल. (प्रस्तुत परिच्छेद, वरील अ) ब) व क) च्या सह वाचावे.)

फ) राज्यातील नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांचे विलीनीकरण/ विभक्त आणि फेररचना याकरिता मुद्रांक शुल्कातून ७५ टक्के सूट देण्यात येईल.

या धोरणांतर्गत येणाऱ्या उद्योगांना मुद्रांक शुल्कातून माफी देण्यापूर्वी शासनाच्या इतर कोणत्याही धोरण / योजनांतर्गत संबंधित उद्योग घटकांना मुद्रांक शुल्कातून माफी घेतल्याची पडताळणी करणे गरजेचे असल्याने, उद्योग विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून माफीबाबत ना-हरकत प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य असेल.

**ii) विद्युत शुल्क** :- उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत झालेल्या नवीन माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, उत्पादन / ॲक्टीव्हिटी सुरु केल्याच्या दिनांकापासून अ व ब

क्षेत्रातील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान, सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यान आणि सार्वजनिक माहिती तंत्रज्ञान उद्यानातील एकाकी घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादन घटकांसह), माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रे, विशेष आर्थिक क्षेत्रातील खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील घटकांना १० वर्षाच्या कालावधीसाठी आणि उत्पादन / ॲक्टीव्हिटी सुरु केल्याच्या दिनांकास प्रचलित सामुहिक प्रोत्साहन योजनेतील क्षेत्राच्या वर्गीकरणानुसार राज्यातील इतर भागांसाठी १५ वर्षे कालावधीसाठी विद्युत शुल्क भरण्यापासून सूट देण्यात येईल.

माहिती तंत्रज्ञान कंपन्यांनी त्यांच्या स्वत:च्या वापरासाठी उभारलेल्या एकाकी माहिती तंत्रज्ञान घटक उद्यानांना (सिंगल युनिट पार्क्स) पुरक सेवा वगळून, विद्युत शुल्क माफीची सवलत वरील नमूद कालावधीसाठी अनुज्ञेय राहील. माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्रामधील नवीन माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक, विशेष आर्थिक क्षेत्रामधील माहिती तंत्रज्ञान उद्यानातील नवीन माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक आणि विशेष आर्थिक क्षेत्रातील एसटीपीआय अथवा अन्य विविक्षित सक्षम प्राधिकरणाकडे नोंदणीकृत १०० टक्के निर्यातक्षम माहिती / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना विद्युत शुल्क भरण्यापासून कायमस्वरुपी सूट देण्यात येईल.

iii) **विद्युत दर** :- उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत असलेल्या माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या (MERC) वीज दराच्या आदेशाप्रमाणे औद्योगिक दराने वीज पुरवठा करण्यात येईल.

iv) **वीज दर अनुदान** :- सामूहिक प्रोत्साहन योजनेमध्ये वर्गीकृत असलेल्या ‘अ’ व ‘ब’ व्यतिरिक्त इतर वर्गीकृत क्षेत्रात, स्थापन होणाऱ्या, नवीन तसेच अस्तित्वात असलेल्या व उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत असलेल्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान घटकांना, खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानातील उद्योग संचालनालयाकडे नोंदणी दिनांक आणि आयटी / आयटीएस ॲक्टव्हिटी सुरु केल्याच्या दिनांकापासून केलेल्या वीज वापराच्या प्रति युनिट रु.१/- या दराने ३ वर्षापर्यंत होणारी रक्कम अथवा घटकाने नोंदणी घेण्याच्या दिवशी हार्डवेअरमध्ये केलेली गुंतवणूकीची रक्कम यातील जी रक्कम कमी असेल, तेवढे अनुदान मिळण्यास पात्र असेल. या क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान विशेष आर्थिक क्षेत्र आणि विशेष आर्थिक क्षेत्रातील माहिती तंत्रज्ञान उद्यान यामधील माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक सदर अनुदान मिळण्यास पात्र असतील.

v) **मालमत्ता कर** :- उद्योग संचालनालयाकडे नोंदणीकृत असलेल्या माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना संबंधित अधिकार क्षेत्रात लागू असलेल्या निवासी दराच्या सममूल्य दराने मालमत्ता कर आकारण्यात येईल. शासन माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना हा लाभ देण्यासाठी स्थानिक स्वराज संस्थांना सूचित करण्यात येईल.

vi) **प्रवेश कर** :- नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना स्वत:च्या उपभोगासाठी आयात केल्या जाणाऱ्या भांडवली वस्तु आणि कच्चा माल यांच्या जकात/ प्रवेश कर/ लोकल बॉडी टॅक्स (एलबीटी) किंवा त्यांच्याऐवजी लावलेल्या अन्य उपकरातून सूट देण्यात येईल. माहिती तंत्रज्ञान/माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना सदरचा लाभ देण्यासाठी शासनाव्दारे स्थानिक स्वराज्य संस्थाना आवश्यक निर्देश देण्यात येईल.

vii) **कार्य संवेदा कर (Work Contract Tax)** :- अपवादात्मक बाबी वगळता माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांच्या वार्षिक देखभाल कराराकरिता सर्वसाधारणपणे केंद्रिय पातळीवरील संबंधीत शक्ती प्रदान समितीने शिफारस केलेल्या किमान दरानुसार कार्य संवेदा कर (Works Contract Tax)आकारण्यात येईल.

**viii) कोणत्याही क्षेत्रात माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांची उभारणी :**

माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटक (माहिती तंत्रज्ञान हार्डवेअर आणि दूरसंचार हार्डवेअर उत्पादक घटक वगळून) कोणत्याही क्षेत्रात (रहिवासी, ना विकास क्षेत्रासह) उभारणी करता येईल.

**ix) मुल्यवर्धित कर :-** अपवादात्मक बाबी वगळता माहिती तंत्रज्ञान उत्पादनावरील मुल्यवर्धित कर सर्व साधारणपणे केंद्रिय पातळीवरील संबंधीत शक्ती प्रदान समितीने शिफारस केलेल्या किमान दरानुसार आकारण्यात येईल.

**x) अविरत उद्योग घटकाचा दर्जा (Continuous Industry Status) :-** माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सेवा घटकांचे ग्राहक जगभर विखुरलेले असून ते भिन्न टाइम झोनमध्ये काम करतात. त्यामुळे ग्राहकांसाठी त्यांना २४X७X३६५ तत्वावर काम करणे आवश्यक आहे. माहिती तंत्रज्ञान घटकांना कामाचा व्याप वाढविण्यासाठी जागतिक ग्राहकांनी दिलेल्या कालमर्यादेचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे. यासाठी नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगांना अविरत उद्योग घटकाचा दर्जा देऊन कोणत्याही दिवशी काम बंद न ठेवता म्हणजेच २४X७X३६५ दिवस काम करण्याची परवानगी दिली जाईल. (राज्यात काही अपवादात्मक परिस्थिती उद्भवल्यास राज्य/ केंद्र सरकारला माहिती तंत्रज्ञान उद्योगांचे काम निलंबित ठेवणे योग्य वाटत असेल तर अशी परिस्थिती वगळता).

## C. ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्ट्स, गेमिंग, आणि कॉमिक्स (ए.व्ही.जी.सी.) या क्षेत्राचे प्रवर्तन

१) संपत्ती आणि रोजगार निर्मितीची अफाट क्षमता असणारे परंतू लोकांमध्ये कमी जागरूकता असलेले ए.व्ही.जी.सी. हे उगवते क्षेत्र आहे. शिक्षण आणि मनोरंजनाचे प्रभावी माध्यम आहे. विद्यमान कल पाहता, भारताचा ए.व्ही.जी.सी. क्षेत्रातील जागतिक बाजारापेठेतील वाटा $ १.५ अब्ज, पर्यंत वाढू शकतो असा अंदाज आहे, तो आजमितीस २% हून कमी आहे.औद्योगिक वाढीसाठी महाराष्ट्र हे नेहमीच अग्रगण्य राज्य गणले आहे. महाराष्ट्राला वैविध्यपूर्ण कला आणि संस्कृतीचा श्रीमंत असा वारसा लाभलेला असून, माहिती तंत्रज्ञान आणि मनोरंजन उद्योगाच्या मजबूत अस्तित्वामुळे तो ए.व्ही.जी.सी. हब होण्यास मदत होवू शकेल.

२) समाजात आतापर्यंत, विज्ञान व तांत्रिक शाखांना रोजगार मिळविण्यासाठी प्राधान्य देण्यात येत होते. परंतू ए.व्ही.जी.सी. च्या माध्यमातून कला शाखेसाठी रोजगाराच्या चांगल्या संधी निर्माण होऊ शकतील. ए.व्ही.जी.सी. उद्योगामध्ये कलाकारांचा प्रवेश हा त्यांची संस्कृती आणि भाषा यांच्या पार्श्वभूमीवर अवलंबून नसते. शिवाय उद्योगात कर्मचारी जवळपास ७० % हे सर्जनशील आणि कलात्मक असण्याची गरज असते त्यामुळे समाजातील आर्थिक दृष्ट्या मागास असलेल्या जनतेचा स्तर उंचावण्यास मदत होईल.

३) प्रस्तुत धोरणाव्दारे उद्योगाच्या गरजेनुसार प्रशिक्षकांना प्रशिक्षण देऊन, प्रशिक्षित अर्हता प्राप्त प्रशिक्षकांची कमतरता दूर करण्यावर भर दिला जाईल. या धोरणाव्दारे जागतिक क्षेत्रातील कंपन्या आकर्षित करणे, या क्षेत्रातील लोकांकरिता मागणी आणि पुरवठा यातील दरी कमी करुन, आंतरराष्ट्रीय पातळीवरील ए.व्ही.जी.सी. क्षेत्रातील काम मोठ्या प्रमाणात आपल्या देशाकडे खेचून घेणे, बौद्धिक संपदा निर्मिती व त्याचे संरक्षण यासाठी एक कायदेशीर चौकट निर्माण करणे या बाबींवर विशेष भर दिला जाईल. याव्यतिरिक्त, देशातील डिजिटल सामग्री, शिक्षण आणि जनतेची करमणूक या क्षेत्रांचा विकास होण्यासाठी सुयोग्य वातावरण निर्माण करणे आणि अत्याधुनिक सुविधा असणाऱ्या सेंटर ऑफ एक्सलन्स ची स्थापना करण्यावर धोरणाचा विशेष भर असेल. वरील सर्व प्रयत्न हे ए.व्ही.जी.सी. उद्योगासाठी, उत्प्रेरक (कॅटालिस्ट) म्हणून काम करतील.

४) ए.व्ही.जी.सी. ही मूलत: माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवेची Actvity असल्याने माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवेसाठी अनुज्ञेय असलेले फायदे मिळण्यास पात्र ठरेल.

i) **महाराष्ट्रात खाजगी ए.व्ही.जी.सी. उद्यानांची स्थापना करणे :-** पायाभूत सुविधांचा विकासाव्दारे ए.व्ही.जी.सी. क्षेत्राच्या वाढीस उदमुक्त करण्यासाठी पुढाकार घेण्यात येईल. धोरण राज्यात खाजगी ए.व्ही.जी.सी. उद्याने उभारण्यासाठी विशेष भर देईल. खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानास असलेली सर्व प्रोत्साहने खाजगी ए.व्ही.जी.सी. उद्यानांनाही अनुज्ञेय असतील. तसेच या धोरणांतर्गत माहिती तंत्रज्ञान / माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा घटकांना देऊ केलेली सर्व प्रोत्साहनाच्या समतुल्य प्रोत्साहने ए.व्ही.जी.सी. उद्यानात स्थापित होणाऱ्या घटकांनाही अनुज्ञेय राहतील.

ii) **ए.व्ही.जी.सी. केंद्रांची स्थापना :** राज्यात ए.व्ही.जी.सी. केंद्राच्या स्थापनेव्दारे सामायिक सोयी /सुविधा पूरवल्यास, शासन पाठिंबा देईल. ए.व्ही.जी.सी. केंद्रामध्ये निर्मिती सुविधा, ए.व्ही.जी.सी. स्टुडिओ, कला सादर करण्यासाठी सभागृह, प्रदर्शन गॅलरी आणि कलाकारास काम करण्यासाठीचे ठिकाण या सारख्या एकात्मिक सुविधांचा समावेश असेल. विकास आयुक्त (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील एका समितीने, ए.व्ही.जी.सी. केंद्राकरिता पायाभूत सोयी-सुविधांच्या गरजा, व त्यासाठी आवश्यक निधी कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक ऑपरेटिंग मॉडेल जसे पीपीपी, स्थान, सुविधा इत्यादी बाबी उद्योगाशी विचार विनिमय करुन सुनिश्चत करेल. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (एमआयडीसी) / शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (सिडको) यासाठी पुढाकार घेतील.

iii) **ललित कला विद्यालय / महाविद्यालय म्हणजे डिजिटल आर्ट सेंटरची स्थापना करणे :** राज्यभरातील विविध ललित कला विद्यालये ही डिजिटल आर्ट सेंटर (डीएसी) म्हणून ओळखली जातील. डिजिटल आर्ट व ॲनिमेशन यासाठीचा अभ्यासक्रम विद्यापीठांच्या सहकार्याने राबविला जाईल. डिजिटल आर्ट सेंटर सार्वजनिक-खाजगी-भागीदारी (पीपीपी) मॉडेलवर चालविण्यात येतील. एकूण खर्चाच्या २५% निधी शासन देईल आणि उरलेला ७५% निधी खाजगी प्रवर्तकाने उभारावयाचा आहे. राज्य शासनाचे योगदान हे रुपये १० कोटी मर्यादेपर्यंत असेल .

विद्यापीठे, उद्योग आणि महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास महामंडळ यासारख्या संस्थांच्या सहकार्यातून ए.व्ही.जी.सी. उद्योगातील व्यावसायिकांचा समूह (Pool) विकसित करण्यात येतील.

**iv)** **सेंटर ऑफ एक्सलेंन्स :-** मुंबई / पुणे येथे सार्वजनिक-खाजगी-भागीदारी (पीपीपी) मॉडेलवर आधारीत ए. व्ही जी. सी सेंटर ऑफ एक्सलेंन्स ची स्थापना करण्यात येईल, त्यासाठी वित्तिय सहाय्य म्हणून येणारा भांडवली खर्च व उपकरणे खरेदी वरील खर्च शासन पुरवेल.

सेंटर ऑफ एक्सलेंन्समध्ये १) फिनिशिंग ॲकॅडमी कम इन्क्युबेशन सेंटर २) पोस्ट प्रॉडक्शन आणि डिजिटल इंटरमिडीएटरी फॅसिलिटी या सुविधा असतील. या बाबींसाठी एमआयडीसी पुढाकार घेईल.

v) **व्हेंचर कॅपिटल फंड:** ॲनिमेशन, व्हिज्युअल इफेक्टस, गेमींग व कॉमिक उद्योग हा भांडवल प्रकृष्ट (कॅपिटल इनटेंसिव्ह) उद्योग आहे. जोखीम भांडवल हे सेवेचा भाग आणि बौद्धिक मालमत्ता निर्मिती यांच्या मिश्रणावर आधारित आहे. त्यामुळे,

आंतरराष्ट्रीय तसेच देशांतर्गत बाजारातील वाढती मागणी पूर्ण करण्यासाठी व्हेंचर कॅपिटल फंडची गरज आहे.

ए.व्ही.जी.सी. क्षेत्रासाठी रु. ५० कोटी इतका व्हेंचर कॅपिटल फंड उभारण्यात येईल. सदरचा रु. ५० कोटीचा निधी व्यवसायिक व्यवस्थापन असलेल्या फंडामार्फत, एव्हीजीसी भाग भांडवल असलेल्या कंपन्या / स्टुडियोजमध्ये, तसेच महाराष्ट्र राज्यात एव्हीजीसी ओरिजनल कंन्टेन्ट तयार करण्यासाठी Focused व्यवसायिक कंन्टेन्ट डेव्हलपमेंट फंडामध्ये गुंतवण्यात येईल. या फंडातून वित्तीय सहाय्यतेच्या संदर्भात मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील शक्तीप्रदान समिती, प्रकरणपरत्वे गुणवत्तेच्या आधारावर निर्णय घेईल.

vi) **ए.व्ही.जी.सी. घटकांसाठी वित्तीय लाभ व सवलती :-** ए.व्ही.जी.सी. घटकांना वरील परिच्छेद ५ (अ) मध्ये असलेल्या सवलतीं व्यतिरिक्त खालील सवलती मिळतील.

अ) **सर्टीफीकेशन शुल्क परतावा :-** सर्व ए.व्ही.जी.सी. निर्यातप्रवण घटकांना अनिवार्य मार्कींगसाठी जसे Conformity European (CE), China Compulsory Certificate (CCC) इत्यादी येणाऱ्या खर्चाचा ५०% मर्यादेपर्यंत व प्रत्येक घटकास जास्तीत जास्त रुपये २ लक्ष इतक्या मर्यादेच्या अधीन राहून परतावा मिळेल.

ब) **भांडवली अनुदान :-**

- राज्याच्या औद्योगिक धोरणानुसार औद्योगिक प्रोत्साहन अनुदान.
- जे ए.व्ही.जी.सी. घटक किमान रुपये ५० कोटीची गुंतवणूक करतील आणि किमान १०० लोकांसाठी रोजगार निर्माण करतील त्या घटकांना स्थिरभांडवलाच्या २५% इतके अँकर युनिट अनुदान देण्यात येईल. स्थिर भांडवलामध्ये जमीन, इमारत, यंत्रसामग्री, उपकरणे, विद्युतीकरण, भांडवलीकृत उत्पादन पूर्व खर्च मधील गुंतवणुकीचा समावेश होईल. प्रत्येक जिल्ह्यातील एका अँकर युनिटला सहाय्य करण्यात येईल.

क) **राज्यात ॲनिमेशन फिल्मसाठी करमणूक कर भरण्यापासून सूट :**

i) महाराष्ट्रात निर्मित झालेल्या आणि राज्यातील सिनेमा हॉल/ मल्टिप्लेक्समध्ये प्रदर्शित झालेल्या, ॲनिमेशन चित्रपटांना करमणूक कर भरण्यापासून सूट देण्यात येईल.

ii) महाराष्ट्रात स्टीरीओस्कोपीव्दारे २डी तून ३डी मध्ये पूर्णपणे रुपांतरीत करण्यात आलेला आणि राज्यातील सिनेमा हॉल/ मल्टिप्लेक्समध्ये प्रदर्शित झालेल्या चित्रपटांना भरलेल्या करमणूक कराच्या ५० टक्के किंवा रु. २.५ कोटी यापैकी जी कमी असेल ती रक्कम परतावा स्वरुपात देण्यात येईल.

iii) महाराष्ट्रात तयार करण्यात आलेल्या एखादया लाईव्ह ॲक्शन चित्रपटामध्ये एकूण लांबीच्या किमान ५०% हून अधिक भाग ॲनिमेशन व व्हीज्युअल इफेक्ट याव्दारे बनविण्यात आला असेल आणि राज्यातील सिनेमा हॉल / मल्टिप्लेक्समध्ये प्रदर्शित झालेल्या चित्रपटांना भरलेल्या करमणूक कराच्या ५० टक्के किंवा

रु. २.५ कोटी यापैकी जी कमी असेल ती रक्कम परतावा स्वरुपात देण्यात येईल. डीआय व कलर करेक्शन हा ॲनिमेशन / व्हीज्युअल इफेक्टसचा भाग मानला जाणार नाही. चित्रपटाच्या एकूण लांबीच्या किमान ५०% हा पात्रतेचा निकष राहील.

ड) **ॲनिमेशन चित्रपट निर्मितीसाठी भांडवली अनुदान :-** राज्यात निर्मित करण्यात आलेल्या सर्जनशील कला चित्रपट, शैक्षणिक, वैज्ञानिक, पौराणिक आणि बाल चित्रपट या ॲनिमेशन चित्रपटांना उत्पादन खर्चाच्या ५०% इतके भांडवली अनुदान रु. ३० लक्ष कमाल मर्यादेच्या अधीन राहून दिले जाईल.

इ) **खालील वार्षिक कार्यक्रमांसाठी महाराष्ट्र हे यजमान राज्य असेल** व या कार्यक्रमांना प्रायोजक म्हणून पुढील ५ वर्षांकरीता प्रत्येक कार्यक्रमासाठी प्रतिवर्ष रुपये १० लाख पर्यंतचा खर्च स्विकारेल आणि अशा कार्यक्रमांना करमणूक कर भरण्यापासून सूट देण्यात येईल.

१) फिक्की फ्रेम (FICCI FRAME) – बेस्ट ॲनिमेटेड फ्रेम्स ॲवॉर्ड, मुंबई.
२) नॅसकॉम (NASSCOM) – गेम डेव्हलपर्स कॉन्फरन्स, पुणे.
३) द ॲनिमेशन सोसायटी ऑफ इंडिया - ॲनिफेस्ट, मुंबई.
४) ASIFA – जागतिक ॲनिमेशन दिन- प्रत्येक वर्षी २८ ऑक्टोबर.
५) एमसीसीआयए- डिजिटल कन्टेंट इव्हेंट, पुणे.
६) एनआयएलएफ- नॅसकॉम इंडियाज लिडरशीप फोरम.

फ) **बिगर वित्तीय सहाय्य :-**

- देशी व विदेशी संस्थांच्या संयुक्त उपक्रमांना (Joint Ventures) राज्य शासन प्रोत्साहित करेल.
- महाराष्ट्रातील ए.व्ही.जी.सी. संदर्भातील आंतरराष्ट्रीय मेळावा (इव्हेंट्स) समर्थन (Support) देण्यात येईल.
- कायदेशीर चौकटीच्या माध्यमातून बौद्धिक मालमत्ता (आयपी) संरक्षित केली जाईल.

**D. ग्रामिण आणि निमशहरी भागात बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंगचे (बीपीओज) या उपक्रमांचे वाढीस उद्युक्त करणे :**

हे धोरण माहिती तंत्रज्ञानाचा वापर, राज्याचा सामाजिक आणि आर्थिक विकास करण्यासाठी साधन म्हणून करेल. तसेच अस्तित्वात असलेल्या बिझनेस प्रोसेस आऊट सोर्सिंग घटकांना/ उद्योजकांना ग्रामिण व निमशहरी क्षेत्रात त्यांच्या शाखा उभारण्यासाठी प्रोत्साहित करेल.

ग्रामीण व निमशहरी (ग्रामपंचायत, अ, ब व क वर्ग नगरपालिका) भागात स्थित असलेल्या बी.पी.ओ. घटकांनाच अनुदान देण्यात येईल. त्याचा तपशील खालीलप्रमाणे :-

**i)** **भांडवली अनुदान :-** कोणत्याही ग्रामीण बी. पी. ओ. घटकास त्यांनी केलेली भांडवली गुंतवणूक जसे हार्डवेअर, उपकरणे इत्यादीवर २० % भांडवली अनुदान रू. २५ लक्ष मर्यादेच्या अधीन राहून देण्यात येईल. तथापि सदर घटकाने किमान ५० (पन्नास) लोकांना प्रशिक्षण देऊन प्रत्यक्ष रोजगार दिला असावा. हे भांडवली अनुदान बॅक ऐंडेड राहील व ते तीन समान हप्त्यांमध्ये प्रत्येक वर्षाच्या शेवटी देण्यात येईल. भांडवली अनुदान देताना घटकाने नवीन हार्डवेअर आणि

उपकरणे यामध्ये केलेली भांडवली गुंतवणूक ज्याप्रमाणे सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम (MSME) Plant & Machinery वर केलेल्या गुंतवणूकीप्रमाणे विचारात घेतली जाईल.

**ii)** **प्रशिक्षण अनुदान :-** ग्रामिण बी. पी. ओ. यांना कर्मचाऱ्यांच्या कामाच्या गुणवत्तेमध्ये उणीवा राहू नयेत तसेच वेळेवर अंमलबजावणी इत्यादी साठी प्रशिक्षणामध्ये गुंतवणूक करावी लागते. याकरीता ग्रामीण / निमशहरी भागात स्थापित होणाऱ्या नवीन बी. पी. ओ. ना कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षणाकरिता आर्थिक मदत करणे गरजेचे असते.

प्रशिक्षण अनुदानाची रक्कम कंपनी आणि शासन यामध्ये विभागण्यात येईल शासनामार्फत प्रति व्यक्ती प्रतिमहा रु. १५०० / - याप्रमाणे तीन महिन्याच्या कालावधीसाठी, प्रशिक्षण अनुदान म्हणून देण्यात येईल (बी.पी.ओ. उद्योगामध्ये कौशल्य विकसित होण्यासाठी सामान्यपणे तीन महिने प्रशिक्षण कालावधी लागतो). त्यामुळे ५० व्यक्तींना रोजगार देणाऱ्या घटकाला तीन महिन्यांच्या कालावधीसाठी रुपये २.२५ लक्ष (रुपये दोन लक्ष पंचवीस हजार फक्त) प्रशिक्षण अनुदान मिळेल. हे अनुदान बॅक एन्डेड असून, बी. पी. ओ. घटकांना त्यांनी व्यक्तीला तीन महिने प्रशिक्षण आणि सतत नऊ महिने रोजगार पुरविल्यानंतर म्हणजेच एक वर्षा नंतर देण्यात येईल.

**iii)** **नामांकित संस्थांकडून प्रशिक्षण अभ्यासक्रम विकसित करणे :-** Yashwantrao Chavan Academy for Development Administration (YASHDA), Maharashtra Centre for Entrepreneurship Development (MCED), Maharashtra Industrial and Technical Consultany Organisation (MITCON) and Media & Entertainment Skills Council (MESC) या सारख्या मान्यताप्राप्त संस्थांकडून वरील कार्यक्रमांची प्रशिक्षण सामुग्री अभ्यासक्रम विकसित करण्यात येईल.

**iv)** **वाहतूकीच्या सोयी :-** ग्रामीण व निमशहरी भागातील बी. पी. ओ. ना आवश्यक ती सार्वजनिक वाहतूक व्यवस्था उपलब्ध करुन देण्यासाठी शासन खात्री करेल.

**v)** **सुरक्षा ठेव / बयाणा रक्कम भरण्यापासून सूट :-** ज्याप्रमाणे सुक्ष्म व लघु घटकांना शासनाने सुरक्षा ठेव / बयाणा रक्कम भरण्यापासून सूट दिली आहे त्याच धर्तीवर ग्रामीण व निमशहरी भागातील बी. पी. ओ. ना सुरक्षा ठेव / बयाणा रक्कम भरण्यापासून सूट देण्यात येईल.

E. **डेटा सेंटर्सचे प्रवर्तन :**

Data Centres are premises offering committed uptime of over 99.95% certified by independent agencies like Uptime Institute, EPI and other similar international independent agencies. Data centres are the basic infrastructure for the new digital economy. Reliable data center offering over 99.95% uptime are necessary for the growth of the digital world services.

मुंबई वर विशेष भर देऊन डेटा सेंटर्सचे प्रवर्तन करण्यासाठी राज्य शासन उत्सुक आहे. मुंबईला केवळ भारतच नव्हे तर आशिया पॅसेफिक विभागात डेटा सेंटर हब म्हणून प्रर्वतीत करण्याचा राज्य शासनाचा मानस आहे.

शाश्वत विज पुरवठा, समुद्रमार्गे मोठया प्रमाणात येणा-या संदेश वहन-वाहिन्या आणि प्रशिक्षित तांत्रिक मनुष्यबळाची उपलब्धता यामुळे मुंबई आशिया पॅसेफिक विभागात मुख्य स्थान होत आहे. ज्यायोगे भारतीय तसेच परदेशी कंपन्या गुंतवणूक करण्यास प्रोत्साहित होत आहेत आणि सेवा पुरवठादार त्यांचे विदेशातील सरव्हर्स मुंबईत आणण्यास उद्युक्त होतील.

विशिष्ट किमान आकाराचे डेटा सेंटर्स हे खूप कार्यक्षम असतात, आणि शासन उर्जा कार्यक्षम व अति शाश्वत डेटा सेंटर्सला प्रोत्साहित करु इच्छिते. २ वर्षाच्या कार्यकाळात किमान १०,००० चौ. फुट व्हाईट स्पेस / उन्नत जागा आणि ७५० के.व्हि.अे. उर्जा वापर असलेले व टीअर-२ प्रमाणपत्र

किंवा त्यापेक्षा अधिक स्तरासाठी आरेखित असलेले व तसे स्वतंत्र संस्थांनी प्रमाणित केलेले डेटा सेंटर्सना यासाठी विचारात घेतले जाईल.

राज्यात कोठेही स्थापित होणारे व वरील अटींची पूर्तता करणारा डेटा सेंटर्स हे वर नमुद परिच्छेद ५B (i), ५ B (ii), ५ B (iii), ५ B (v), ५ B (vi), ५ B (viii) - ( फक्त विशेष वस्तुंच्या आयातीसाठी ) आणि ५ B (x) प्रमाणे प्रोत्साहने / सवलतीस पात्र राहतील.

कामाचे स्वरुप आणि महत्व विचारात घेता डेटा सेंटर्सचे काम थांबविता येत नाही. ही बाब विचारात घेऊन डेटा सेंटर्स हे Essential Services and Maintenance Act (ESMA) अंर्तगत अत्यावश्यक सेवा म्हणून गणले जातील.

**F. उद्योजकता, नाविन्यास आणि इनक्युबेशन सुविधांकरिता प्रोत्साहन देणे :-**

i) विविध शैक्षणिक संस्था व संशोधन संस्था आणि माहिती तंत्रज्ञान उद्योग, यांच्यात ज्ञान स्रोतांची देवाण-घेवाण व प्रसार होण्यासाठी एक सामाईक व्यासपीठ उभारुन लहान उद्योगांकरीता इनक्युबेशन सेंटरची स्थापना करण्यास शासन मदत करेल. माहिती व दूरसंचार, तंत्रज्ञान क्षेत्रासाठी, एम्बेडेड सॉफ्टवेअर, चिप तंत्रज्ञान, दूरसंचार तंत्रज्ञान याकरीता सबंध राज्यात इन्क्युबेशन सेंटर्सची स्थापना करण्याकरिता विकास आयुक्त (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली समिती एक मॉडेल व चौकट निश्चित करेल.

i) नवीन घटकांना सक्षम करण्यासाठी इनक्युबेशनच्या सुविधा देण्याकरिता नवीन माहिती तंत्रज्ञान उद्यानांना त्यांच्या बांधीव क्षेत्राच्या कमीत कमी २ टक्के क्षेत्र वाटप करावे लागेल. उद्यानाचे हे क्षेत्र माहिती तंत्रज्ञानाच्या कार्याकरिता वापरावयाच्या क्षेत्राचा एक भाग म्हणून गणन्यात येईल. व सदर अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांकाचा लाभ मिळण्यास पात्र ठरेल.

iii) माहिती तंत्रज्ञान /माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा क्षेत्रात २ वर्षात किमान ५० स्थानिक विद्यार्थ्यांना भरती करणाऱ्या इन्क्युबेशन लॅबोरेटरी/ संशोधन व विकास केंद्रांना रुपये २.५ लक्ष पर्यंत भरती अनुदान देण्यात येईल.

iv) नॅसकॉम आणि आयटीपीओ यांनी आयोजित केलेल्या अथवा मान्यता दिलेल्या प्रदर्शनात भाग घेणाऱ्या नोंदणीकृत माहिती तंत्रज्ञान/ माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा सुक्ष्म, लघु व मध्यम घटकांना प्रदर्शनात भाग घेण्यासाठीच्या शुल्काच्या ५० % (जागेची किंमत / भाडे) रक्कम परतावा देण्यात येईल. प्रत्येक युनिटसाठी रु. ३ लक्ष रक्कमेच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून घटक अथवा कंपनी यांना त्यांचे हयातीत जास्तीत जास्त २ कार्यक्रमांसाठी सदरचा लाभ घेता येईल.

v) सुक्ष्म, लघु व मध्यम माहिती तंत्रज्ञान घटकांना /कंपन्याना त्यांचे हयातीत पेटेंट घेण्यासाठी येणाऱ्या खर्चाच्या ५०% रक्कम रुपये ५ लक्ष रक्कमेच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून परतावा करेल.

**G. हरित माहिती तंत्रज्ञानाचा विकास :**

i) नैसर्गिक स्रोताचे व्यवस्थापन कार्यक्षमरित्या प्रदर्शित करणाऱ्या माहिती तंत्रज्ञान घटकांकरिता पुरस्कार देण्यात येतील.

ii) ई-कचरा गोळा करण्याच्या पध्दतीचा तसेच पुनरुत्पादन संयंत्रांचा परिपूर्ण विकास करुन त्याचा शासकीय आणि खाजगी संस्थांनी त्यांच्या माहिती तंत्रज्ञान उत्पादनांची विल्हेवाट लावण्यासाठी वापर करण्यास चालना देण्यात येईल.

**H. महाराष्ट्र ब्रँन्ड विकसित करणे :-**

i) सर्वसाधारणपणे माहिती तंत्रज्ञान क्षेत्राशी आणि विशेषतः ए.व्ही.जी.सी. शी संबंधित असणाऱ्या आंतर-राष्ट्रीय व देश-पातळीवरील व्यावसायिक परिसंवाद, प्रदर्शन इत्यादी कार्यक्रमांच्या महाराष्ट्रातील आयोजनास शासन पाठिंबा देईल.

